


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १६ वे ] नोव्हेंबर १९६२ [ अंक २



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

# नवभारत

वर्ष सोळावे | नोव्हेंबर
अंक दुसरा | १९६२

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत--प्रा. वि. म. बेडेकर-प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा-मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई (जि. सातारा)

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

[ मराठी साहित्य महामंडळाने ठरविलेले शुद्धलेखन अनुसरण्याचे ठरविले असून त्याप्रमाणे शुद्धलेखनपद्धति अनुसरली आहे. का. सं. ]

# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ]

[ मूल्य रु. २०

संपादक : **डॉ. पी. एल्. वैद्य** एम्. ए., डी. लिट्. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, कीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

**मिळण्याचें ठिकाण —**

**प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई** ( सातारा )







अनुक्रमणिका

# सार-संकलन

## नेफा व भारतीय धोरण

भारत-चीन कलहाविषयी 'मँचेस्टर गार्डियन' साप्ताहिकाने ता. २० सप्टेंबरच्या अंकात एक उद्बोधक स्फुट लिहिले आहे. त्याचा हा थोडक्यात सारांश :

" भारत-चीन कलहाचा केंद्रबिंदू आता पुन्हा लडाखकडून ईशान्य सरहद्दीवरील मॅक्मोहन सीमारेषे-कडे झुकला आहे. तीन वर्षांपूर्वी येथेच प्रथम कलहाला सुरुवात झाली. उत्तरेकडे हजार मैलावर अक्साइ चीन पठारावरील रस्ता त्यापूर्वीच चीनने तयार केला होता खरा. पण भारत सरकारला त्यासंबंधी माहिती नव्हती. शिवाय परकीय आक्रमणाच्या संभाव्यतेचा लष्करी दृष्टीने विचार केल्यास भारताला ईशान्य सरहद्दी-विषयीच अधिक चिंता वाटणे स्वाभाविक आहे. चीनने खरोखरच भारत जिंकायचा म्हटल्यास त्याला याच दिशेने सेना आणावी लागेल. लडाखच्या बाजू-कडील पर्वतांच्या आधारे संरक्षण करणे त्या मानाने भारताला सोपे आहे. गेल्या दोन वर्षांत भारत-चीन-मधील प्रसिद्धी दिल्या गेलेल्या चकमकी लडाखच्या प्रदेशातच झाल्या हे खरें. तथापि ( पाकिस्तानाशी चालू असलेल्या खेदजनक कलहाच्या गरजा वगळ-ल्यास ) भारताला आपले बरेचसे सैन्य ईशान्य सर-हद्दीवरच ठेवावे लागले आहे; व ते काही केवळ नागांच्या बंदोबस्तासाठीच नव्हे.

उलट चीनला मॅक्मोहन सीमारेषेविषयी विशेष चिंता असण्याचे कारण नाही. किंबहुना ब्रह्मदेशाशी करार करताना तिच्यातील काही भागापुरता आक्षेप त्यांनी सोडून दिला आहे. तथापि अक्साइचीनचे पठार हे मात्र त्यांना लष्करी व आर्थिक दृष्टीनेही अत्यंत मोलाचे आहे; कारण त्या पठारावरील मार्गाच्या योगाने सिंकियांग तिबेटशी जोडले गेले आहे. यामुळे लडाखमधील त्यांचा दावा मान्य झाल्यास ईशान्य सरहद्दीवरील आपले म्हणणे ते बदलतील व हक्क सांगण्याचे सोडून देतील असे वेळोवेळी सुचविण्यात आले आहे.

या प्रश्नाचा केवळ लष्करी दृष्टीनेच विचार करावयाचा असता तर हा समझोता शक्य झाला असता. परंतु कायमच्या व राजकीय दृष्टिकोणातून ही भूमिका भारताला अमान्य आहे. त्याचा दावा अर्थपूर्ण आहे; चीनचा अर्थशून्य आहे. आंतरराष्ट्रीय कायद्याच्या सर्वमान्य तत्त्वानुसार लडाखचा प्रदेश हा त्यांचा आहे असे भारताचे म्हणणे. 'नेफा'मधील आपला प्रदेश हा आपलाच आहे अशी केवळ चीनची संमति मिळवि-ण्यासाठी लडाखमधील आपल्या प्रदेशाचा त्याग करण्यासाठी त्यांनी काय म्हणून सिद्ध व्हावे असा त्यांचा प्रश्न आहे. शिवाय भारत हे लोकशाही राष्ट्र आहे. यामुळे राज्यकर्त्यांनी जरी एकवेळ काही सवलती द्यायच्या ठरवल्या तरी त्या ते जनतेच्या गळी उतरवू शकतील की नाही हा प्रश्न शिल्लक राहातोच.

नेहरुंविरुद्ध या बाबतीत भारतात कडक टीका होताना दिसते खरी. पण त्यांचे धोरण अधिक चांगले होण्याचा प्रश्न दूरच पण आहे त्यापेक्षा निराळे कसे होऊ शकले असते हे समजणे कठिण आहे; तत्त्वतः तरी हे मान्य करावे लागते. व्यवहारात कदाचित् थोड्याफार सुधारणा सुचविता येतीलही. भारतीय भूमीचे अबाधित्व कायम राखणे व त्याबरोबर वातावरण फारसे गरम न होऊ देणे हे त्याचे उद्दिष्ट आहे. नामुष्कीवाचून मागे जाण्याची संधी ते चीनला सतत देत असतात; व यामुळे भारतीय लोकमत कित्येकवेळा चिडल्यासारखे दिसते. चीन या संधीचा कधीच फायदा घेताना दिसत नाही. पण याच मार्गाने हा वाद आज ना उद्या थंडावणे शक्य आहे.

## क्युबा आणि सहजीवन

गेल्या काही दिवसातील घडामोडींनी क्यूबाच्या प्रश्नाला पुनः महत्त्व प्राप्त झाले आहे. क्यूबावर हल्ला झाल्यास त्यातून युद्ध उद्भवेल अशी घोषणा सप्टेंबर २१ रोजी केलेल्या एका भाषणात क्रुश्चेव्हने केली होती. केनेडींनी नाटो राष्ट्रांनी या बाबतीत काही पावले टाका-वीत अशी अपेक्षा व्यक्त केली पण ब्रिटनकडून तिला नकार मिळाला. आता हे प्रकरण चिघळू लागले आहे. लंडन 'ऑब्झर्वरने याबाबत ७ ऑक्टोबरच्या अंकात लिहिलेल्या अग्रलेखाचा सारांश येथे देत आहोत.

" क्यूबाबाबत अमेरिकेत प्रक्षोभाची लाट उसळली आहे. या प्रक्षोभाची तीव्रता बाहेर ध्यानात येणे कठिण आहे. क्यूबाची आर्थिक नाकेबंदी करण्यास नाटो राष्ट्रांनी दिलेला नकार बहुसंख्य अमेरिकन जनतेला आपली प्रतारणा करणारा वाटतो. प्रसंगी दंडशक्तीचा








वापर करूनही क्यूबा हे अमेरिकाखंडात कम्युनिझम प्रसाराचे केंद्र बनण्याची शक्यता हाणून पाडली पाहिजे अशी मागणी अमेरिकेत होऊ लागली आहे.

हा क्षोभ वाढत असूनही केनेडी अजून तरी स्थिर आहेत. नाटो राष्ट्रांनी आपली जहाजे क्यूबातील बंदरात जाऊ देऊ नयेत अशी सूचना त्यांनी केली. पण ब्रिटिश सरकारच्या वतीने लॉर्ड होम यांनी तसे करण्यास नकार दर्शविला, ' क्यूबाशी आमचे भांडण नाही. तेथील सरकारला आम्ही मान्यता दिली आहे. शिवाय अशी नाकेबंदी केल्याने क्यूबा रशियाच्या अधिकच आधीन होण्याचा संभव आहे. ' अशी रास्त भूमिका त्यांनी घेतली आहे. किंबहुना रशियन जहाजे क्यूबात जाऊ द्यायची नाहीत असा प्रयत्न केल्यास त्यातून युद्धही निर्माण होण्याचा संभव आहे.

रशियाने क्यूबात आपले ' सैनिक पाठवायला सुरुवात केली, क्यूबाला शस्त्रास्त्रे पुरवायला आरंभ केला, व आता तेथे आपला एक तळही मासे पकडण्याच्या निमित्ताने स्थापन करण्याचे ठरविले आहे. या सर्व प्रकारांमुळे तेथील परिस्थिती पूर्णपणे बदलली आहे असा अमेरिकेचा दावा आहे. या सर्व घटना अमेरिकेला चीड आणणाऱ्या आहेत खऱ्या, पण त्या धोक्याच्या नाहीत. शेवटचा तळ स्थापण्याचा निर्णय तर निश्चितच चिडविणारा आहे. पण रशियन भूमीवरून गेलेल्या यू-२ विमानांच्या पेक्षा त्याला अधिक महत्त्व नाही. अमेरिकेची अपेक्षा तरी काय होती ? क्यूबातील कम्युनिस्टानुकूल राजवट स्वस्थ उभे राहून नष्ट होताना रशिया पाहू शकेल काय ? व तसे केल्यास अन्य कम्युनिस्ट राष्ट्रांची प्रतिक्रिया काय होणार ? अमेरिका ज्याप्रमाणे पर्शिया वा विएटनाम येथील राजवटींना मदत करते त्याचप्रमाणे व त्याच हेतूनी प्रेरित होऊन रशिया क्यूबाला सहाय्य करीत आहे.

पण अमेरिकन लोकांचे म्हणणे असे की क्यूबाची गोष्ट निराळी आहे. तो त्यांच्या प्रभावाखालील प्रदेशात आहे. क्यूबात कम्युनिझमला उत्तेजन देऊन रशियाने प्रस्थापित परिस्थिती बदलून टाकली आहे. खरे म्हणजे रशियाने क्यूबाला कम्युनिस्ट व्हावयास लावले नाही. कम्युनिस्ट व्हायला क्यूबाने काही रशियाची परवानगी विचारली नव्हती. प्रस्थापित परिस्थितीत अशाच तऱ्हेची माघार रशियाला युगोस्लाव्हियात घ्यावी लागली आहे. हे सोविएटचे अंकित राष्ट्र बंड करून उठले व ते आता अमेरिकेचे सहाय्य व शस्त्रास्त्रांची मदत घेत आहे. रशिया चिडला, युगोस्लाव्हियाला त्याने दमही दिला, पण त्याने काही युद्ध केले नाही.

रागावले म्हणजे अमेरिकन लोक मन्रो सिद्धान्ताचा निर्वाळा देऊ लागतात. पण तो सिद्धान्त म्हणजे काही आंतरराष्ट्रीय कायद्यांतील अबाधित तत्त्व नव्हे. १८२३ साली कोणत्याही युरोपीय राष्ट्राने पाश्चात्य (अमेरिका) गोलार्धांत हस्तक्षेप केल्यास ते शत्रुत्वाचे कृत्य मानले जाईल, अशी अमेरिकेचे अध्यक्ष मन्रो यांनी घोषणा केली, त्यावेळी पूर्व गोलार्धांत अमेरिकेने हस्तक्षेप न करण्याची भूमिकाही त्यांनी स्वीकारली होती. आज जगात सगळीकडे अमेरिकन सेना व तळ पसरलेले आहेत; व ते चांगलेही आहे. युरोप, कोरिया, व्हिएतनाम इत्यादि ठिकाणी अमेरिकन सैन्य आहे. तुर्कस्तान, जर्मनी, जपान इत्यादी सोविएट लगतच्या प्रदेशात अमेरिकेचे लष्करी तळ आहेत. हे सर्व योग्य व रास्त आहे; पण रशिया मात्र पश्चिम गोलार्धांत कोठेही दिसू लागताच ते आक्रमण होय असे कसे म्हणता येईल ?

लॅटिन अमेरिकेत कम्युनिस्टांचा शिरकाव झाल्यास पाश्चात्य राष्ट्रांच्या अडचणी कितीतरी वाढतील हे कोणीही नाकारू शकणार नाही. पण कॅस्ट्रोच्या क्यूबापासूनचा खरा धोका राजकीय आहे, लष्करी नव्हे. त्याची साधने म्हणजे अस्त्रे नसून विचार हे होत; मन्रो-सिद्धान्ताने किंवा दण्डनीतीने ते दूर ठेवता येणार नाहीत. अमेरिकेने मनात आणल्यास एका दिवसात कस्ट्रोची राजवट नाहीशी होऊ शकेल. क्रुश्चेव्हने दिलेली अणुयुद्धाची धमकी फारशी महत्त्वाची आहे असेही नाही. पण त्यायोगाने लॅटिन अमेरिकेतील कम्युनिझमचा धोका मुळीच नाहीसा होणार नाही आणि रशिया दुसरीकडे कोठेतरी उट्टे काढील. जगाच्या दृष्टीने रशियाचा हंगेरीवरील हल्ला कधीच समर्थनीय ठरला नाही. तसाच अमेरिकेचा क्यूबावरील हल्लाही ठरणार नाही.

रशिया व अमेरिका या दोहोंच्याही दृष्टीने क्यूबा ही सहजीवनाची कसोटी आहे. अमेरिकेची सहजीवनावर श्रद्धा असेल तर जगातील इतर भागाप्रमाणेच पाश्चात्य गोलार्धातही तिने ते स्वीकारले पाहिजे. आणि










क्रुश्चेव वेळोवेळी म्हणतो त्याप्रमाणे त्याला ते मान्य असेल तर अमेरिकेला अकारण भडकविण्याचे त्याने सोडून दिले पाहिजे. क्यूबाच्या प्रश्नाबाबत अमेरिकन लोकमत चुकीचे व काहीसे आक्रस्ताळेपणाचे आहे. पण आजच्या राजकीय समतोलात तो एक महत्त्वाचा घटक आहे. अमेरिका हे एक महान् राष्ट्र आहे. अमेरिकन लोक हे स्वाभिमानी आहेत. ते दमदाटीला भीक घालणार नाहीत. क्यूबाला आर्थिक सहाय्य द्यावे पण मासेमारीच्या तळाची कल्पना सोडून द्यावी, अशी भूमिका क्रुश्चेव्हने घेणेच शहाणपणाचे आहे. अण्वस्त्राच्या चांचणीस बंदी, बर्लिनचा प्रश्न किंबहुना सर्व जगातील शांततेचा प्रश्न यासंबंधी यशस्वी बोलणी करण्याचा संभव क्यूबामुळे नष्ट करण्यांइतके त्याला महत्त्व देणे म्हणजे शुद्ध मूर्खपणा होय.

### शास्त्रीय संशोधनकार्याचे वाढते स्वरूप

'ब्रिटिश असोसिएशन फॉर ॲडव्हान्स्टमेंट ऑफ् सायन्सच्या अध्यक्षपदावरून सर जॉन कॉक्रॉफ्ट यांनी नुकतेच एक अत्यंत महत्त्वाचे भाषण केले. शास्त्रीय संशोधनासाठी पुरेसा खर्च करण्याच्या गरजेचे महत्त्व समजावून सांगणे हा त्यांचा उद्देश होता. हे भाषण ब्रिटनमधील परिस्थिती ध्यानात घेऊन करण्यात आले असले तरी सर्वांच्याच दृष्टीने महत्त्वाचे आहे. म्हणून ता. १ सप्टेंबरच्या 'नेचर' वरून त्यातील काही महत्त्वाचे मुद्दे येथे देत आहोत.

रुदरफोर्ड यांच्या प्रयोगशाळेत सुरू झालेल्या किरणोत्सर्गविषयक संशोधनापासून आरंभ करून सर जॉन म्हणाले प्रत्यक्ष व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीने हे कार्य आरंभी कोणालाही महत्त्वाचे वाटले नाही. पण पाचएक वर्षांच्या आतच अल्फा-कणांच्या योगाने नैट्रोजन अणूंचे विघटन करता येईल अशी रुदरफोर्ड याची खात्री झाली; पंचवीस वर्षांच्या आत फर्मी याची 'ॲटोमिक पाइल' तयार झाली व पन्नास वर्षांच्या आतच निरनिराळ्या राष्ट्रांतील शेकडो पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व स्थापत्यशास्त्रज्ञ यांच्या सहकार्याने झालेल्या कामातून अणुशक्तीपासून मोठ्यां प्रमाणात विद्युत् उत्पादन केंद्र प्रथम ब्रिटनमध्ये उभारले गेले. ही घटना मौलिक संशोधनाचे (फंडामेंटल्) महत्त्व उत्तम रीतीने सिद्ध करते. विद्यापीठे व तंत्रज्ञानाची महाविद्यालये यांना उत्तमोत्तम माणसाची निवड करून संशोधनाची प्रत्यही वाढती जबाबदारी घेता यावी यासाठी भरपूर सहाय्य दिले गेले पाहिजे, हे स्पष्ट करणारी ही घटना आहे. प्राथमिक कणांच्या क्षेत्रातील संशोधनकार्याच्या सतत वाढत्या व्यापाचा विचार केल्यास हे क्षेत्र कित्येक वर्षे भौतिकी विद्येत निश्चितपणे आघाडीवर राहील हे त्यांनी स्पष्ट केले. त्या योगाने मानवाचे विश्वाचे आकलन कितीतरी संपन्न झाले आहे हे उघड आहे.

अत्यंत शक्तिमान कणांच्या या संशोधन कार्याबरोबरच सर जॉन यांनी त्याहून कमी पण निश्चित शक्तीच्या कणांच्या (पार्टिकल्स्) क्षेत्रातील संशोधनाचाही उल्लेख केला व त्याबरोबरच "रेडिओ ॲस्ट्रॉनमी" व "ऑप्टिकल् ॲस्ट्रॉनमी"च्या क्षेत्रातील शास्त्रज्ञांनी विश्वाचे स्वरूप समजण्याच्या कामात केलेले सहाय्य सांगितले. ॲस्ट्रॉनमी (ज्योतिष) व अंतराळविज्ञान ही एकत्र येत असल्याचे सांगून 'न्युक्लीअर' पदार्थविज्ञानाप्रमाणेच याही क्षेत्राचे महत्त्व सतत वाढत असल्याचे ते म्हणाले. "मौलिक संशोधनकार्यात आंतरराष्ट्रीय सहकार्याचे महत्त्व कितीतरी पटींनी वाढले आहे. आर्थिक अडचणी व शास्त्रीय जिज्ञासा या दोहोंमुळे आम्हाला आज अमेरिकेशी, उद्या पश्चिम युरोपशी, पर्यायाने सर्वांशीच सहकार्य करावे लागेल" असे ते म्हणाले. उलट, अंतराळातील प्रवास ही मात्र अगदी निराळी बाब आहे. या कामासाठी रशिया व अमेरिका दरवर्षी दोनशे ते तीनशे कोटी डॉलर खर्च करीत आहे व सर जॉन यांच्या म्हणण्याप्रमाणे हा खर्च बव्हंशी प्रतिष्ठेसाठीच आहे. खरे म्हणजे याबाबतीतल्या खर्चाच्या क्रमातच उलटापालट झाली आहे. मानवी व आर्थिक साधनांच्या मर्यादा ध्यानात घेऊन शास्त्रीय संशोधनासाठी शक्य तितका अधिक खर्च केला पाहिजे असे सर जॉन यांचे म्हणणे. पण अंतराळप्रवास हा मात्र त्यात बसू शकणार नाही.

तंत्रविद्येच्या प्रगतीमुळे अधिकाधिक सूक्ष्म, नाजूक वा सामर्थ्यवान उपकरणे तयार करणे सुलभ होते. ती उपलब्ध झाली म्हणजे शास्त्रीय संशोधन आणखी पुढे जाते. असा शास्त्र व तंत्रविद्या यांचा अन्योन्यसंबंध असला तरी त्यायोगे संशोधनखर्चही वाढत जाणार हेही उघड आहे. यामुळेच संशोधनात आंतरराष्ट्रीय







सहकार्य दिवसेंदिवस अपरिहार्य होत जाते. अशा सहकार्याने गेल्या दहावीस वर्षांपूर्वी कोणाला कल्पनाही आली नसती इतका विकास झाला आहे. आणि कोणतेही मौलिक संशोधनक्षेत्र पूर्णपणे सोडून दिल्यास त्याचे तंत्रविद्येवर व औद्योगिक क्षेत्रावर परिणाम होणे अपरिहार्य आहे.

कित्येक निरनिराळ्या क्षेत्रातील विकासाचा आढावा घेऊन सर जॉन यांनी तंत्रविद्येच्या संशोधनाचे संघटन सुधारता येईल काय ? सरकारी सहाय्य आजच्या पेक्षा अधिक परिणामकारक करण्याचे मार्ग कोणते, असे प्रश्न उपस्थित केले. कदाचित काही अमेरिकन संघटनांपासून ब्रिटनला थोडेबहुत शिकावे लागेल. पण सर्जनशीलतेला योग्य वाव मिळावयाचा असेल तर संघटनेचा आकार विशिष्ट मर्यादेपलिकडे वाढता कामा नये. अत्यंत खर्चाच्या साधनसामग्रीचा उपयोग करायचा म्हणजे संघटनेचा आकार विशिष्ट किमान मर्यादेहून कमी ठेवता येणार नाही हे उघड आहे. तथापि त्याबरोबरच आकारापेक्षा संघटनेचे स्वरूप अधिक महत्वाचे आहे हेही विसरता येणार नाही. सर्जनशील कार्याला अनुकूल सवलती व वातावरण यांना खरे महत्त्व आहे. याहष्टीने काही शास्त्रज्ञ तरी शासनाच्या व्यवस्थापनाच्या स्थानावर असणे आवश्यक आहे. तथापि येथेच खरी अडचण निर्माण होते. विद्यापीठातील कार्य वाढवायचे म्हटल्यास आज पुरेसे गणिती, शास्त्रज्ञ, तंत्रविशारद इत्यादी मिळू शकत नाहीत असा अनुभव आहे. अनेक शास्त्रज्ञ अमेरिकेस जातात व तेथेच स्थायिक होतात. हे टाळायचे असेल तर येथे संशोधनासाठी सवलती निर्माण कराव्या लागतील. संशोधनाची वाढती साधने व गरजा ध्यानात घेऊन विद्यापीठांना दिली जाणारी अनुदाने कितीतरी वाढणे जरूर आहे.

### फ्रान्समधील पेचप्रसंग

" अल्जिरियातील परिस्थिती स्थिरावत असून स्वतंत्र राष्ट्र म्हणून बेन बेलाच्या नेतृत्वाखाली तेथील कारभार योग्य रीतीने सुरू होण्याची चिन्हे दिसू लागल्याची कल्पना फ्रेंच जनतेला नुकतीच येऊ लागली होती. आता फ्रेंच असेंब्लीने पाचव्या प्रजासत्ताकाच्या इतिहासात प्रथमच सरकारचा पराभव केला असून एक महिन्याच्या आत पुनः निवडणुका व्हाव्यात अशी परिस्थिती निर्माण केली आहे. या दोन घटनांचा प्रत्यक्षपणे नसला तरी काही अंशी एकमेकांशी संबंध आहेच. अल्जिरियातील युद्ध संपले की द गॉल यांना नापसंत असलेले फ्रेंच " राजकारण " पुनः डोके वर काढू लागेल, अशी अनेकांची अपेक्षा होती. " संकटमय परिस्थितीतून पुढे मार्ग काढण्याचा उपाय म्हणजे अध्यक्षावरील श्रद्धा. " ही परिस्थिती एकदा बदलली की राजकारणी लोक पुनः पूर्वीच्या वळणावर जाणारच असे अनेकांना वाटत होते; व तसेच आता होत आहे.

राजकारणाने पुनः डोके वर काढणे याचा द गॉल यांच्या मताने दुर्दैवाने एक विशिष्ट अर्थ आहे. चौथ्या प्रजासत्ताकाच्या काळातील राजकीय नेते व चळवळे पुनः कलहया, गटबाजी व उलथापालथ घडवून आणण्याचे, अनेक राजकीय पक्षांच्या कारवाईच्या वातावरणात अटळ असलेले खटाटोप पुनः सुरू करतील असा तो अर्थ आहे. अर्थात् या समजुतीबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. ओरड करू शकणाऱ्या निरनिराळ्या गटांच्या विचारांची व हितसंबंधांची जुळणूक या अर्थाने राजकारणाविषयी द गॉलना कधीच फारशी आस्था वाटली नाही. ते हुकूमशहा नाहीत; तथापि आपण नि जनता यांच्यामध्ये संघटित मध्यस्थ असणे मात्र त्यांना मुळीच पसंत नाही. या विशिष्ट दृष्टिकोणाचे काही परिणाम झाले आहेत. एकतर असेंब्लीला सामान्यतः कायमचे शांत करता वा दडपून ठेवता यावे यासाठी राज्यघटनेत काही सुधारणा करण्यात आल्या. आणि या सुधारणांना पार्लमेंटची संमति घेण्याऐवजी, काहीशा वादग्रस्त घटनात्मक नियमाच्या आधारे, ऑक्टोबर २८ तारखेस जनतेचे सार्वमत घेण्याचा निर्णय घेण्यात आला.

यामुळे जुन्या प्रजासत्ताकातील सगळेच पक्ष चेकाळले. त्यांनी एकजूट करून कम्युनिस्टांच्या— किंबहुना जुन्या द गॉलच्या युनिअन व्यतिरिक्त सर्वांच्याच सहाय्याने पॉंपिदु सरकारचा पराभव केला. असेंब्ली अशा प्रकारे खवळण्याचे कारण अध्यक्षांनी ( द गॉल ) जनतेला आवाहन केले, व आपल्या भूमिकेला पाठिंबा न दिल्यास राजिनामा देण्याची धमकी दिली हे होय. नेहमीच्या घटनात्मक मार्गाने या सुधारणेला पार्लमेंटची संमति मिळविण्याचे अध्यक्षांनी ठरविले असते तर ते कितीतरी कठिण होते हे खरे आहे. अमेरिकन अध्य-








क्षाची प्रतिष्ठा फ्रान्सच्या अध्यक्षांना असावी असे द गॉलना वाटते; पण तिच्याशी समतोल राखणारी अमेरिकन काग्रसची प्रतिष्ठा फ्रेंच पार्लमेंटला असावी हे मात्र त्यांना मान्य नाही. यामुळे राज्याच्या कार्यकारी सत्तेबद्दलचा– अध्यक्षाबद्दलचा– फ्रेंच जनतेचा अविश्वास कितीतरी वाढला आहे. तथापि या प्रश्नांचा बारकाईने विचार करणाऱ्या अनेकांना, फ्रान्सला असेंब्लीच्या शासनाचे अराजक पुनः आणणे परवडणार नाही असेही वाटते. राजकीय समतोलावर आधारलेली अमेरिकन पद्धतीची घटना स्वीकारण्याचीही अनेकांची तयारी आहे. तथापि अध्यक्षांनी आता हे रचनात्मक सुधारणावादी व चौथ्या प्रजासत्ताकातील राजकारणी यांना एकत्र आणले आहे.

पूर्वीचे बहुमत थाडस कमी झाले तरी एकंदरीत पाहता द गॉलला पूर्वीप्रमाणेच मतदारांचा पाठिंबा मिळेल अशी चिन्हे दिसत आहेत. सार्वत्रिक निवडणुकीत मात्र द गॉल यांच्या पक्षाला फारसा पाठिंबा मिळण्याचा संभव नाही. आणि जुन्या पार्लमेंट इतकाच नव्या पार्लमेंटचाही द गॉलच्या विचारांना विरोध झाल्यास दोहोतील कलह अटळ होईल व अत्यंत खेदजनक परिस्थिति निर्माण होईल. असा पेचप्रसंग निर्माण होऊ देण्याऐवजी राजकीय सुधारणा समजुतदारपणाने व देवाणघेवाण पद्धतीने घडवून आणाव्यात असे अनेक विचारी फ्रेंच लोकांना अजूनही वाटते. ('मँचेस्टर गार्डियन' ११ आक्टोबरच्या अंकातील लेखाचा सारांश).

## दक्षिण व्हिएटनाममध्ये कलाटणी ?

दक्षिण व्हिएटनाममधील परिस्थिति गेल्या वर्षी बरीच चिघळली होती. उत्तर व्हिएटनाममधून येणाऱ्या कम्युनिस्टांच्या छुप्या हल्ल्यामुळे व गनिमी लढाईमुळे सायगाव बाहेर जीवन सर्वस्वी असुरक्षित झाले होते व जीमची राजवट कोलमडणार की काय अशी शंकाही येऊ लागली होती. आता या परिस्थितीला कलाटणी मिळत असल्याची चिन्हे दिसू लागली आहेत. या संबंधी 'टाइम' साप्ताहिकाने १२ ऑक्टोबरच्या अंकांत एक माहितीपूर्ण स्फुट लिहिले आहे, ते येथे देत आहोत.

"द. व्हिएतनाममध्ये १०००० अमेरिकन लष्करी "सल्लागार" आहेत. वार्ताहारही तितकेच असावेत असे काही वेळा वाटते. ज्या लढाईविषयी ते बातम्या पाठवीत असतात ती लढाई म्हणजे जंगलात अधून मधून होणाऱ्या चकमकी. एकंदर परिस्थितीचा अंदाज देताना ते सामान्यतः निराशेचा सूर काढीत असतात. पण गेल्या काही महिन्यात मात्र ही निराशा काहीशी कमी होऊ लागली आहे. काही वेळा त्याऐवजी आशाही व्यक्त केली जाते. गेल्या आठवड्यात राष्ट्रीय असेंब्लीपुढे केलेल्या एका भाषणात जीम म्हणाले "आता परिस्थिती आटोक्यात आली असून आमचा तिच्यावर ताबा आहे. आजवर पावसाळ्याचे दिवस शत्रूला अनुकूल असत. आता तसे नाही. विजय निश्चित आहे. इतकेच नव्हे तर तो नजीक आला आहे."

या आशादायक परिस्थितीची जीमनी सांगितलेली मुख्य लक्षणे (१) अर्ध्याहून अधिक लोकांना सुरक्षित खेड्यातून ठण्यात आले आहे. यामुळे विएतकाँगच्या (उ. व्हिएतनामकडून येणारे कम्युनिस्ट हल्लेखोर) वेळी अवेळी होणाऱ्या हल्ल्यापासून त्यांचे संरक्षण होते आणि कम्युनिस्ट हल्लेखोरांना अन्न व लपण्याची ठिकाणे मिळणे कठिण जाते. सुमारे ३००० मोक्याची घरे बांधून झाली आहेत. (अमेरिकन तज्ज्ञांच्या मते ही संख्या २००० असून त्यातील निम्मीच परिणामकारण आहेत.) आणखी ९००० घरे बांधण्याची योजना आहे.

(२) व्हिएतनामी लष्करी संख्या गेल्या वर्षांत तिप्पट झाली आहे. विजय निश्चित असल्याने कित्येक जण लष्करात सामील होत आहेत.

(३) पिके अजून निघायची असूनही तांदुळाचे भाव गेल्या १५ वर्षांत प्रथमच खाली आले आहेत; कारण ग्रामीण भागातून शहराकडे येणारा माल आता कम्युनिस्टांना अडविता येत नाही. (अमेरिकन तज्ज्ञ या व्यतिरिक उत्तरेकडील भागात आलेले भाताचे उत्तम पीक हेही आणखी एक कारण सांगतात) याखेरीज लहान सहान उद्योगधंद्यांची झपाट्याने वाढ होऊ लागल्याने व शेतीच्या सुधारणेच्या कार्यक्रमामुळे परिस्थिती सुधारू लागली आहे.

विजय नजीक आला आहे हा जीमचा दावा काहीसा अवास्तव आशावादाचा द्योतक आहे, पण अगदी शंकास्पद दृष्टीने पाहिले तरी विएतनाममधील परिस्थिती गेल्या वर्षाच्या मानाने कितीतरी निवळली आहे हे मानावे लागते.

प्रा. मे. पुं. रेगे

# ॲरिस्टाटलचे संविधानशास्त्र : २ :

ॲरिस्टॉटलला संविधानाच्या फक्त तीन आकृती माहीत होत्या, चवथी आकृति त्याला माहीत नव्हती, त्या आकृतीचा शोध गालेन ह्या तत्त्ववेत्त्याने लावला असे सर्वसाधारणपणे समजले जाते. ॲरिस्टॉटलला चवथी आकृति माहीत नव्हती हे म्हणणे एका दृष्टीने खरे आहे. संविधानांच्या आकृतींचे ॲरिस्टॉटलने केलेले दिग्दर्शन असे : "जर संविधानाच्या साहाय्याने आपल्याला 'क' विषयी 'ग' सिद्ध करावयाचे असेल तर ह्या दोहोंचा ज्याच्याशी संबंध आहे असे एखादे समान पद आपण घेतले पाहिजे; आणि ही गोष्ट तीन रीतींनी करणे शक्य आहे. एक तर ग चे 'ख' विषयी आणि ख चे क विषयी विधेयन करून किंवा ख चे दोहोंविषयी विधेयन करून किंवा ख विषयी दोहोंचे विधेयन करून. ( संविधानाच्या ) आकृति असा आपण मागे ज्यांचा उल्लेख केला होता त्या ह्याच होत आणि कोणतेही संविधान ह्या ( तीन ) आकृतींपैकी कोणत्या तरी एका आकृतीत असले पाहिजे हे स्पष्ट आहे." ( An. pr. i, 23, 40 b 30 )

ह्या उताऱ्यावरून संविधानाच्या केवळ तीन आकृति असू शकतात असे ॲरिस्टॉटलचे मत होते हे उघड आहे. अर्थात् हे मत चूक आहे. ॲरिस्टॉटलने मान्य केलेल्या ह्या तीन आकृतींशिवाय संविधानाची आणखीही एक आकृति – वर निर्दिष्ट केलेली चवथी आकृति – असू शकते. मौजेची गोष्ट ही की ॲरिस्टॉटलने आपल्या लिखाणात चवथ्या आकृतीतील संविधाने दिलेली आहेत. उदा० तो एके ठिकाणी म्हणतो की, "जर आपल्याला 'ग सर्व ख च्या अंगी आहे आणि 'ख सर्व क च्या अंगी आहे' ही विधाने उपलब्ध असली तर त्यांच्यापासून 'क' काही ग च्या अंगी आहे' हे विधान निष्पन्न करता येते; कारण ह्या विधानापासून ( बार्बारा ह्या संविधानाला अनुसरून ) 'ग सर्व क च्या अंगी आहे' हे विधान निष्पन्न होते आणि ह्या विधानापासून परिवर्तनाने 'क काही ग च्या अंगी आहे' हे विधान निष्पन्न होते. ( An. pr. i. 28 $44^a$ 12-35 हा सबंध उतारा पहा. ) वर दिलेल्या उताऱ्याचा सारांश असा की —

> जर ख सर्व क च्या अंगी आहे आणि ग सर्व ख च्या अंगी आहे तर क काही ग च्या अंगी आहे.

( ६ )

हे संविधान ॲरिस्टॉटल प्रमाण म्हणून मान्य करतो. परंतु हे संविधान चवथ्या आकृतीतील आहे. त्याच्या उत्तरांगात उद्देश्यस्थानी असलेले पद पूर्वांगांत विधेय-स्थानी आहे आणि विधेय-स्थानी असलेले पद उद्देश्य-स्थानी आहे. ह्या संविधानाचे नाव 'ब्रामान्तिप्.' त्याचप्रमाणे ॲरिस्टॉटलने 'दिसामिस्' ह्या संविधानाची दिलेली पुढील सिद्धि पहा. "जर एका पदाचा मध्यमपदाशी सार्वत्रिकपणे संबंध जोडलेला असेल आणि दुसऱ्या पदाच्या भागाचा मध्यमपदाशी संबंध जोडलेला असेल आणि ही दोन्ही विधाने जर अस्तित्वाची असतील तर मग ह्या दोन विधानांपैकी कोणतेही विधान सामान्य असेना का, त्यांच्यापासून संविधान बनविता आलेच पाहिजे. कारण,

> जर ग सर्व ख च्या अंगी आहे आणि क काही ख च्या अंगी आहे तर क काही ग च्या अंगी आहे.

( ७ )

ज्या अर्थी ( ॲरिस्टॉटल पुढे म्हणतो ) अस्तित्वाची विधानांचे परिवर्तन करता येते त्या अर्थी ख काही क च्या अंगी असणार म्हणून,

> जर ग सर्व ख च्या अंगी आहे आणि ख काही क च्या अंगी आहे तर ग काही क च्या अंगी असणार ( आणि म्हणून क काही ग च्या अंगी असणार ). ( An. pr. i. 6 28b 7 )

( ८ )

ह्या उताऱ्याचे तात्पर्य हे की ह्या उताऱ्यात पुढील संविधनाचे प्रामाण्य ॲरिस्टॉटलने सिद्ध केले आहे :









अनुक्रमणिका

जर ख कांही क च्या अंगी आहे आणि ग सर्व ख च्या अंगी आहे तर क कांही ग च्या अंगी आहे. (९)

हे संविधान म्हणजे चवथ्या आकृतीतील 'दिमारिस्' होय. [(८) आणि (९) मधला फरक म्हणजे एक तर (८) च्या पूर्वांगातील घटक विधान-रूपांचा क्रम (९) च्या पूर्वांगात बदललेला आहे. ह्याविषयी पुढे (३, ३) पहा. आणि दुसरे म्हणजे (८) च्या उत्तरांगाचे परिवर्तन करून (९) चे उत्तरांग प्राप्त झाले आहे.]

त्याचप्रमाणे ॲरिस्टॉटलने 'फेसापो' आणि 'फ्रेसिसोन्' ह्या संविधानांचे प्रामाण्य एका ठिकाणी सिद्ध केले आहे. (An. pr. 1, 7, 29a 19) तो म्हणतो, " ... जर क कांही किंवा सर्व ख च्या अंगी आहे आणि ख कुणाही ग च्या अंगी नाही तर ग काही क च्या अंगी नसणार." आणि असे म्हणण्याचे कारण ॲरिस्टॉटल असे देतो की वरील संविधानांच्या पूर्वांगातील घटक विधान-रूपांचे परिवर्तन करून ही गोष्ट दाखवून देता येते. ह्या साऱ्या म्हणण्याचा उलगडा असा करता येईल. समजा,

ख कुणाही ग च्या अंगी नाही. (१०)

मग (१०) पासून परिवर्तनाने

ग कुणाही ख च्या अंगी नाही (११)

हे विधान निष्पन्न होते. त्याचप्रमाणे,

क सर्व ख च्या अंगी आहे (१२)

किंवा

क काही ख च्या अंगी आहे (१३)

ह्या विधानापासून परिवर्तनाने

ख कांही क च्या अंगी आहे (१४)

हे विधान प्राप्त होते. आता (११) आणि (१४) पासून फेरिओ ह्या संविधानानुसार 'ग कांही क च्या अंगी नाही' हे विधान निष्पन्न होते. पहा:

जर ग कुणाही ख च्या अंगी नाही आणि ख काही क च्या अगी आहे तर ग काही क च्या अंगी नाही (१५)

तेव्हां (१०) आणि (१२) किंवा (१०) आणि (१३) ह्या विधानांना संयुक्तपणे पूर्वांग म्हणून स्वीकारून आणि (१५) च्या उत्तरांगाचा उत्तरांग म्हणून स्वीकार करून प्राप्त होणारी संविधाने प्रमाण ठरतात.

जर ख कुणाही ग च्या अंगी नाही आणि क सर्व ख च्या अंगी आहे तर ग काही क च्या अंगी नाही (१६)

त्याचप्रमाणे,

जर ख कुणाही ग च्या अंगी नाही आणि क काही ख च्या अंगी आहे तर ग काही क च्या अंगी नाही. (१७)

आता, (१६) आणि (१७) म्हणजे 'फेसापो' आणि 'फ्रेसिसोन्' ही चवथ्या आकृतीतील संविधाने. ह्या दोन संविधानांशिवाय आणखी तीन संविधाने चवथ्या आकृतीत आहेत आणि तीही ॲरिस्टॉटलने मान्य केली आहेत. ॲरिस्टॉटल म्हणतो की, " सर्व सामान्य संविधाने (म्ह० ज्यांचे उत्तरांग एक सामान्य विधान आहे अशी संविधाने) एकापेक्षा अधिक निष्कर्ष प्राप्त करून देतात आणि विशेष संविधानांपैकी अस्तिवाची संविधाने एकापेक्षा अधिक निष्कर्ष देतात. परंतु, (विशेष) नास्तिवाची संविधाने एकच निष्कर्ष देतात. कारण विशेष नास्तिवाची विधाने सोडल्यास इतर सर्व विधानांचे परिवर्तन करता येते; आणि (संविधानाच्या) उत्तरांगात कशाविषयी तरी काही तरी सांगितलेले असते (व म्हणून ते विधान असते.) म्हणून, विशेष नास्तिवाची संविधाने सोडली तर इतर सर्व संविधाने एकपेक्षा अधिक निष्कर्ष प्राप्त करून देतात; उदा० जर ख सर्व किंवा काही क च्या अंगी आहे हे सिद्ध करण्यात आले असेल तर क सुद्धा काही ख च्या अंगी असणार ... आणि हा अगोदरच्या निष्कर्षाहून भिन्न असा निष्कर्ष आहे." (An. pr. ii. 1, 53a 4).

ह्या उताऱ्याचा अर्थ असा : समजा, आपण 'बार्बारा' हे संविधान घेतले :

जर ग सर्व ख च्या अंगी आहे आणि ख सर्व क च्या अंगी आहे तर ग सर्व क च्या अंगी आहे (१८)

ह्या संविधानात त्याच्या पूर्वांगापासून 'ग सर्व क च्या अंगी आहे' हें विधान निष्पन्न होते असे म्हणता येईल. पण 'सर्व क च्या अंगी आहे' ह्या विधानापासून परिवर्तनाने 'क काही ग च्या अंगी







आहे ' हे विधान निष्पन्न होते. तेव्हा (१८) च्या पूर्वांगापासून 'क काही ग च्या अंगी आहे' हे विधान निष्पन्न होते असे म्हणता येईल व ही गोष्ट पुढील संविधानाच्या सहाय्याने मांडता येईल :

जर ग सर्व ख च्या अंगी आहे आणि ख सर्व क च्या अंगी आहे तर क काही ग च्या अंगी आहे. (१९)

आता, (१८) व (१९) ह्यांची उत्तरांगे भिन्न असल्यामुळे ती भिन्न संविधाने आहेत. (१९) हे संविधान म्हणजे चवथ्या आकृतीतील 'ब्रामान्तिप्' होय. (१९) च्या पूर्वांगातील विधान-रूपे, त्यांचा क्रम बदलून लिहिली, तर हे अधिक स्पष्ट होईल.

जर ख सर्व कच्या अंगी आहे आणि ग सर्व खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे (२०)

ह्याच रीतीने पहिल्या आकृतीतील 'सेलारेन्त्' आणि 'दारिइ' ह्या संविधानांच्या उत्तरांगाचे परिवर्तन करून प्राप्त होणारी विधाने घेतली आणि त्याचा ह्याच संविधानांच्या पूर्वांगाशी उत्तरांगे म्हणून संयोग केला तर चवथ्या आकृतीतील 'कामेनेस्' व 'दिमारिस्' ही संविधाने प्राप्त होतात.

ह्या सर्व विवेचनातून सारांश असा की चवथ्या आकृतीत मोडणारी पाचही संविधाने ॲरिस्टॉटलला अवगत होती. संविधानाचे चवथ्या आकृतीतील हे प्रकार त्याला ठाऊक नव्हते किंवा त्यांचे प्रामाण्य त्याला मान्य नव्हते असे जे कित्येक तत्त्ववेत्त्यांचे मत आहे ते चूक आहे. ॲरिस्टॉटलची स्वतःची चूक एवढीच की संविधानाच्या आकृतीची (वर उद्धृत केलेली) जी व्याख्या त्याने दिली आहे तिच्यामध्ये चवथ्या आकृतीला स्थान नाही. ॲरिस्टॉटलने दिलेली व्याख्या आणि त्याने स्वतः प्रमाण म्हणून मान्य केलेली संविधाने ह्यांच्यातील ह्या विरोधाचे कारण कदाचित् असे असेल की Prior Anatytics च्या पहिल्या अध्यायाच्या सातव्या प्रकरणात आणि दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या प्रकरणात नमूद केलेल्या ह्या (चवथ्या आकृतीतील) संविधानांचा शोध ॲरिस्टॉटलला पहिला अध्याय बराचसा लिहून झाल्यावर लागला असावा; आणि म्हणून ह्या संविधानांची नीट व्यवस्था तो लावू शकला नाही; त्यांना त्यांचे योग्य ते स्थान तो देऊ शकला नाही. त्याचा शिष्य थिओफ्रॅस्टस् ह्याने ती गोष्ट केली कशी ते पुढे पाहू.

(२) पण ॲरिस्टॉटलने आणखीही एक चूक केली आहे. ती म्हणजे 'मध्यम-पद' 'कनिष्ठ-पद' आणि 'ज्येष्ठ-पद' ह्यांची त्याने केलेली व्याख्या. मध्यमपदाची व्याख्या संविधानाच्या पहिल्या आकृतीच्या स्वरूपाचे वर्णन करताना त्याने दिलेली आहे. 'जेव्हा तीन पदांचा परस्परांशी असलेला संबंध असा असतो की शेवटचे पद मध्यम-पदात सामावलेले असते आणि मध्यम-पद पहिल्या पदात सामावलेले असते किंवा नसते तेव्हा ह्या अंत्य पदापासून (म्ह. तिसऱ्या व पहिल्या पदांपासून) संविधानाची पूर्ण आकृति निर्माण होते.'' (An. pr. i. 4, 25 b 32) पहिल्या आकृतीला ॲरिस्टॉटल पूर्णाकृती म्हणतो आणि वर उध्दृत केलेल्या वाक्यात त्याने पहिल्या आकृतीचे वर्णन केले आहे. त्याच्या पुढल्याच वाक्यात आपण मध्यम-पद कशाला म्हणतो हे त्याने स्पष्ट केले आहे. 'जे पद स्वतः दुसऱ्या पदात सामावलेले असते आणि दुसऱ्या एका पदाला स्वतःमध्ये सामावून घेते त्याला मी मध्यम-पद म्हणतो; त्याचे स्थान पहातासुद्धा हे पद मध्य असते.'' पुढे, ज्येष्ठ पद आणि कनिष्ठ पद ह्यांची व्याख्या तो अशी करतो. "ज्या पदामध्ये मध्यम-पद सामावलेले असते त्या पदाला मी ज्येष्ठ पद म्हणतो आणि जे पद मध्यम-पदामध्ये (सामावलेले) असते त्याला कनिष्ठ-पद म्हणतो.'' (An. pr. i. 4. 26a 21) मध्यम-पद, ज्येष्ठ-पद आणि कनिष्ठ-पद ह्यांच्या ह्या व्याख्या सर्व संविधानांच्या बाबतीत लागू पडतील अशी ॲरिस्टॉटलची कल्पना होती असे दिसते. पण ती चूक आहे.

एक पद दुसऱ्या पदामध्ये सामावले आहे ह्याचा अर्थ असा की पहिल्या पदाने निर्दिष्ट होणाऱ्या व्यक्ती दुसऱ्या पदाने निर्दिष्ट होणाऱ्या व्यक्तींच्या वर्गामध्ये सामावलेल्या असतात. उदा० 'कावळा' हे पद 'पक्षी' या पदामध्ये सामावलेले आहे. कारण, 'कावळा' ह्या पदाने निर्दिष्ट होणाऱ्या सर्व व्यक्ती (म्ह० सर्व कावळे) 'पक्षी' ह्या पदाने निर्दिष्ट होणाऱ्या व्यक्तींच्या वर्गामध्ये मोडतात. 'सामावण्याचा' हा अर्थ ध्यानात घेतला तर मध्यम-पद, ज्येष्ठ-पद आणि कनिष्ठ-पद ह्यांच्या ॲरिस्टॉटलने केलेल्या व्याख्या फक्त 'बार्बारा' ह्या संविधानाला लागू पडण्यासारख्या आहेत ही गोष्ट सहज ध्यानात

येईल. ह्या व्याख्या पहिल्या आकृतीतील बार्बारा-शिवाय इतर संविधानांना लागू पडत नाहीत, आणि इतर आकृतींना तर मुळीच लागू पडत नाहीत उ० वर दिलेले (२·(३)) हे संविधान घ्या. ह्या संविधानामध्ये 'मानव' हे पद 'मर्त्य' ह्या पदा-मध्ये सामावलेले आहे आणि 'मानव' हे पद 'ग्रीक' ह्या पदाला स्वतःमध्ये सामावून घेते. तेव्हा, मध्यम–पदाच्या वर दिलेल्या व्याख्येनुसार ह्या तीन पदांपैकी 'मानव' हे मध्यम–पद आहे. त्याचप्रमाणे, मध्यम–पदाला स्वतःमध्ये सामावून घेणारे पद म्हणून 'मर्त्य' हे पद ज्येष्ठ आहे आणि मध्यमपदामध्ये सामावलेले म्हणून 'ग्रीक' हे पद कनिष्ठ आहे. परंतु 'दारिइ' मधील पुढील संविधान घ्या :

> जर सर्व कावळे पक्षी आहेत आणि काही प्राणी कावळे आहेत तर काही प्राणी पक्षी आहेत (२१).

(२१) मधील तीन पदांपैकी असे पद कोणते आहे की जे स्वतः एका पदामध्ये सामावलेले आहे आणि दुसऱ्या एका पदाला स्वतःमध्ये सामावून घेते ? असे पद कोणतेच नाही. 'कावळा' हे पद 'पक्षी' ह्या पदामध्ये सामावलेले आहे खरे पण 'प्राणी' हे पद 'कावळा' ह्या पदामध्ये सामावलेले नाही. तेव्हा, काटेकोर रीतीने पाहिले तर मध्यमपदाची ॲरिस्टॉटलने दिलेली व्याख्या ज्याला लावता येईल असे कोणतेच पद ह्या संविधानात नसल्यामुळे ह्या संविधानात मध्यम–पदच नाही असे म्हणावे लागेल. आणि मध्यम–पद नसल्या-मुळे ज्येष्ठ पद आणि कनिष्ठ पदही नाही असे म्हणावे लागेल. वास्तविक, ॲरिस्टॉटलने मध्यम–पदाची दुसरी एक व्याख्या दिलेली आहे. ती व्याख्या अशी : "जे पद दोन्ही पक्षविधानात (premisses) मांडण्यात आलेले असते ते पद आपण मध्यम–पद म्हणून मानले पाहिजे ; कारण कोणतीही आकृति घेतली तरी मध्यम–पद दोन्ही विधानात असणे आवश्यक आहे" (An. pr. i. 32473$8^a$) ही व्याख्या सर्व संविधानांना लागू पडते. पण ह्या व्याख्येत आणि मध्यम-पदाच्या वर दिलेल्या व्याख्येत भेद आहे. तीच गोष्ट ज्येष्ठ आणि कनिष्ठ पदांची. व्यवहारात उत्तरांगाच्या विधेयाला ॲरिस्टॉटल ज्येष्ठ पद मानतो आणि उद्देश्याला कनिष्ठ पद मानतो. पण ॲरिस्टॉटलची ही प्रथा आणि ह्या पदस्थानाची त्याने केलेली व्याख्या ह्याच्यात तफावत आहे ह्यात शंका नाही. उदा० (२१) मध्ये 'प्राणी' हे पद उत्तरांगाचे उद्देश्य असल्यामुळे कनिष्ठ आहे. परंतु मध्यमपदामध्ये सामावलेले नसल्यामुळे ॲरिस्टॉटलच्या व्याख्येप्रमाणे कनिष्ठ नाही. ह्या सव अडचणी लक्षात घेतल्या तर ॲरिस्टॉटलने केलेली व्याख्या योग्य नाही असे म्हणावे लागते.

जेव्हा संविधानाच्या पूर्वांगात एखादे नास्तिवाची विधान असते, तेव्हा ह्या अडचणी अधिकच बिकट होतात. उदा० 'सेलरेन्त' हे संविधान घ्या.

> जर कुणीही युरोपिअन हिंदी नाही आणि सर्व ब्रिटिश युरोपिअन आहेत तर कुणीही ब्रिटिश हिंदी नाही. (२२)

पूर्वांगातील दोन्ही विधानांना समान असलेले पद म्हणून 'युरोपिअन' हे पद मध्यम–पद आहे असे म्हणता येईल. पण ज्येष्ठ पद कोणते ? 'युरोपि-अन' हे पद 'हिंदी' ह्या पदात सामाव-लेले तर नाहीच पण त्या पदापासून व्यावृत्त (excluded) असे पद आहे. दुसरीही एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ॲरिस्टॉटलने दिलेल्या व्याख्येप्रमाणे कनिष्ठ पद मध्यम-पदामध्ये सामावलेले असते आणि मध्यम–पद ज्येष्ठ पदामध्ये सामावलेले असते. ह्याचा अर्थ असा की कनिष्ठ पद ज्येष्ठ पदामध्ये सामावलेले असते. ह्या तीन पदांचा असा परस्पर-संबंध असतो की ज्येष्ठ पद सर्वांत अधिक व्यापक असते आणि इतर दोन्ही पदें त्याच्यात सामावलेली असतात. आता (२२) मधील तीन पदातील 'युरोपिअन' हे पद सोडले तर जी उरतात ती म्हणजे 'ब्रिटिश' आणि 'हिंदी' ह्या दोघातील एक पद ज्येष्ठ असणार आणि दुसरे कनिष्ठ असणार. पण ह्यांच्यातील कोणते पद ज्येष्ठ आहे आणि कोणते कनिष्ठ आहे हे कसे ठरविणार ? ॲरिस्टॉटलच्या व्याख्येप्रमाणे जे पद अधिक व्यापक आहे ते ज्येष्ठ होय. पण 'ब्रिटिश' आणि 'हिंदी' ह्या दोन पदांपैकी कोणते पद व्यापक आहे ? ही पदे तर परस्पर–व्यावर्तक आहेत.

ह्या अडचणींचा विचार प्राचीन काळापासून होत आला आहे. उ० पेरिपॅटेटिक तत्त्ववेत्त्यांनी असले प्रश्न उपस्थित केले होते. ते म्हणतातः जर संविधानाचे








उत्तरांग सामान्य अस्तिवाची असेल तर त्याच्या विधेयामध्ये त्याच्या उद्देश्याचा समावेश होत असल्यामुळे त्यांच्यातील कोणते पद ज्येष्ठ आहे आणि कोणते पद कनिष्ठ आहे हे ठरविता येते. त्या दोन पदांमध्ये एक पद दुसऱ्यामध्ये समाविष्ट असण्याचा जो संबंध आहे त्या संबंधावरून एका पदाचा ज्येष्ठभाव आणि दुसऱ्याचा कनिष्ठभाव निश्चित होतो. तेव्हा ज्येष्ठ आणि कनिष्ठ ही पदांची स्थाने वस्तुनिष्ठ आहेत असे म्हणता येईल. पण जेव्हा संविधानाचे उत्तरांग हे सामान्य नास्तिवाची असते तेव्हा त्या विधानांतील पदांमधील संबंधावरून कोणते पद ज्येष्ठ आणि कोणते कनिष्ठ हे ठरविता येणार नाही. मग त्याच्यातील कोणते पद ज्येष्ठ आहे आणि कोणते कनिष्ठ आहे हे आपण कोणत्या आधारावर ठरविणार ? समजा, उत्तरांगाचे उद्देश्यपद म्हणजे कनिष्ठपद आणि विधेयपद म्हणजे ज्येष्ठपद असे आपण मानले तरी हा प्रश्न सुटत नाही. कारण, समजा एखाद्या संविधानाच्या पूर्वांगापासून जर एखादे 'कुणीही क ग नाही' असे सामान्य नास्तिवाची उत्तरांग निष्पन्न होत असेल तर त्याच पूर्वांगापासून 'कुणीही ग क नाही' हे (पहिल्या उत्तरांगाचे परिवर्तन करून प्राप्त होणारे) उत्तरांगही निष्पन्न होत असते. मग ह्या दुसऱ्या संविधानात 'क' ऐवजी 'ग' हे पद कनिष्ठ ठरेल आणि 'क' हे पद ज्येष्ठ ठरेल. म्हणजे, दोन पदांपकी एकदा एक पद ज्येष्ठ ठरेल आणि दुसऱ्यांदा दुसरे पद ज्येष्ठ ठरेल. तर मग पदांची ज्येष्ठ व कनिष्ठ ही स्थाने पदांमधील परस्पर संबंधावर आधारलेली असतात की आपण केवळ संकेताने त्यांच्यापैकी एखादे पद ज्येष्ठ आहे आणि दुसरे कनिष्ठ आहे असे ठरवितो ? ज्येष्ठ आणि कनिष्ठ ही स्थाने पदांच्या 'प्रकृती'वर आधारलेली आहेत का ? (Do major and minor terms exist by nature ?) की केवळ संकेतावर आधारलेली आहेत ? (or, do they exist by convention ?)

ह्या बाबतीत अलेक्झांडरचे म्हणणे असे आहे की संविधानाचा उपयोग आपण एखादे विधान सिद्ध करण्यासाठी करतो. तेव्हा ह्या साध्यविधानाचे विधेयपद म्हणजे ज्येष्ठ पद आणि उद्देश्यपद म्हणजे कनिष्ठ पद असे ठरते. समजा, आपल्याला 'कुणीही क ग नाही' हे विधान जर संविधानद्वारा सिद्ध करावयाचे असेल तर त्या संविधानाचे 'क' हे कनिष्ठ पद आणि 'ग' हे ज्येष्ठ पद ठरेल. पण जर आपल्याला 'कुणीही ग क नाही' हे विधान सिद्ध करायचे असेल तर त्या संविधानाचे 'क' हे ज्येष्ठ पद आणि 'ग' हे कनिष्ठ पद ठरेल. पण असे म्हणण्यातील एक अडचण अशी आहे की दर वेळेला एखादे विधान सिद्ध करण्यासाठीच आपण संविधान रचतो असे नाही. अनेकदा, स्वीकारलेल्या दोन विधानांपासून कोणते तिसरे विधान निष्पन्न होते ते आपण पहात असतो. मग अशा वेळेला त्या संविधानाच्या पदांपैकी कोणते पद ज्येष्ठ आहे आणि कोणते कनिष्ठ आहे हे आपण कसे ठरविणार ? दिलेल्या दोन विधानांपासून ज तिसरे विधान निष्पन्न होत असते त्याचे उद्देश्य म्हणजे कनिष्ठ पद असे म्हणून भागणार नाही. कारण जेव्हा दोन विधानांपासून संविधानाने 'कुणीही क ग नाही' हे विधान निष्पन्न होत असते तेव्हा 'कुणीही ग क नाही' हे विधानही निष्पन्न होत असते. म्हणून 'क' हे कनिष्ठ पद आहे की 'ग' हे कनिष्ठ पद आहे हे ठरविता येणार नाही. मग कनिष्ठ व ज्येष्ठ ही पदांची स्थाने केवळ सांकेतिक आहेत असे समजायचे काय ? ह्या बाबतीत जॉन फिलोपोनस ह्या भाष्यकाराने केलेला खुलासा संपूर्णपणे ग्राह्य मानला पाहिजे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे ज्येष्ठ आणि कनिष्ठ ह्या पदांची व्याख्या आपल्याला पहिल्या आकृतीच्या दृष्टीने करता येईल. किंवा सर्व आकृतींना लागू पडेल अशा रीतीने करता येईल. पहिल्या आकृतीच्या दृष्टीने पाहिले तर संविधानाच्या पूर्वांगात जे पद मध्यमपदाशी विधेय म्हणून संबंधित असते ते ज्येष्ठपद आणि ज उद्देश्य म्हणून संबंधित असते ते कनिष्ठ पद असे म्हणता येईल. परंतु, दुसऱ्या किंवा तिसऱ्या आकृतीच्या बाबतीत अशी व्याख्या करता येणार नाही. कारण दुसऱ्या आकृतीत इतर दोन्ही पदें मध्यमपदाशी विधेय म्हणून संबंधित असतात आणि तिसऱ्या आकृतीत उद्देश्य म्हणून संबंधित असतात. तेव्हा मध्यमपदाशी त्याच्या असलेल्या संबंधावरून ह्या दोन पदात ज्येष्ठ व व कनिष्ठ हा भेद करता येणार नाही. संविधानाच्या सर्व आकृतींना लागू होईल अशी ह्या पदस्थानाची व्याख्या करावयाची झाली तर ती अशी करता येईल : पूर्वांग व उत्तरांगाचे मिळून बन-

लेले कोणतेही संविधान घेतले तर त्याच्या उत्तरांगाचे विधेय म्हणजे ज्येष्ठ पद आणि उद्देश्य म्हणजे कनिष्ठ पद. आणि ज्येष्ठ व कनिष्ठ पदांमधील हा भेद 'वस्तुनिष्ठ' आहे की केवळ 'संकेतावर' आधारलेला आहे ह्या प्रश्नाचे जॉन फिलोपोनस ह्याने स्पष्ट उत्तर दिले आहे. ते म्हणजे, हा भेद संकेतावर आधारलेला आहे. म्हणजे एखाद्या संविधानात जी तीन पदे असतात त्या पदाच्या व्याप्तीमधील–त्या पदांनी निदिष्ट होणाऱ्या वस्तूंच्या वर्गामधील – परस्पर-संबंधावर हा भेद आधारलेला नसतो, तर आपण पदस्थानांच्या केलेल्या व्याख्येवर हा भेद अवलंबून असतो.

३ जॉन फिलोपोनसने कनिष्ठ आणि ज्येष्ठ पदांच्या केलेल्या व्याख्या स्वीकारल्या–ह्या व्याख्या प्रचलित आहेत – तर त्याच्यापासून संविधानाचे कनिष्ठ विधान आणि ज्येष्ठ विधान ह्यांच्या व्याख्या उपलब्ध होतात. संविधानाच्या पूर्वांगातील ज्या घटकविधानात कनिष्ठ पद असते ते कनिष्ठ विधान आणि ज्याच्यात ज्येष्ठ पद असते ते ज्येष्ठ विधान. संविधानाची मांडणी करताना ज्येष्ठ विधान प्रथम आणि कनिष्ठ विधान नंतर मांडावे असा सर्वसाधारण संकेत आहे. पण शिवाय सर्वसाधारणपणे असाही एक समज प्रचलित आहे की विधानांचा हा एक क्रम तार्किक तत्त्वावर आधारलेला आहे. ज्येष्ठ विधान प्रथम मांडणे आणि कनिष्ठ विधान नंतर माडणे हे तार्किक दृष्ट्या आवश्यक आहे. ह्या मतात कितपत तथ्य आहे ?

हा मुद्दा थोडक्यात निकालात काढता येईल. कोणत्याही संविधानात त्याच्या पूर्वांगापासून त्याचे उत्तरांग निष्पन्न होते असे मांडलेले असते असे म्हणता येईल. संविधानाचे पूर्वांग 'र आणि ल' ह्या रूपाचे एक संयुक्त विधान असते आणि सबंध संविधान म्हणजे 'जर (र आणि ल) तर स' ह्या रूपाचे विधान असते. आता तार्किक नियमाप्रमाणे 'र आणि ल' आणि 'ल आणि र' ही विधाने समानार्थी असतात. जेव्हा 'र आणि ल' हे विधान खरे असते तेव्हा आणि तेव्हाच 'ल आणि र' हे विधानही खरे असते. तेव्हा 'र आणि ल' आणि 'ल आणि र' ह्या दोन विधानात अर्थाच्या, आशयाच्या दृष्टीने काहीच फरक नसल्यामुळे, जर (र आणि ल) पासून 'स' निष्पन्न होत असेल तर '(ल आणि र)' पासूनही 'स' निष्पन्न होणारच. तेव्हा 'र' व 'ल' ह्या दोन विधानांना 'आणि' ह्या संयोजकाने जोडून प्राप्त होणाऱ्या पूर्वांगाचे अवयव कोणत्याही क्रमाने मांडले तरी त्या संविधानाच्या प्रामाण्यात फरक पडणार नाही. ज्येष्ठ विधान प्रथम लिहिले काय किंवा कनिष्ठ विधान प्रथम मांडले काय त्यामुळे संविधानाचे प्रामाण्य अबाधित राहते. ज्येष्ठ विधान प्रथम मांडले पाहिजे ही गोष्ट तार्किक दृष्ट्या आवश्यक नाही; तो केवळ एक 'संकेत' आहे.

ॲरिस्टॉटलची प्रथाही अशीच आहे. सर्वसाधारणपणे ज्येष्ठ विधान तो प्रथम मांडतो. परंतु, तिसऱ्या आकृतीतील 'फेलाप्तोन', 'दिसामिस्', 'दातिसि' आणि 'बोकार्दो' ही संविधाने मांडताना तो कनिष्ठ विधान प्रथम मांडतो आणि ज्येष्ठ विधान नंतर मांडतो. 'दातिसि' हे संविधान तर त्याने दोन तऱ्हांनी मांडले आहे. एकदा तो ज्येष्ठ विधान प्रथम मांडतो तर एकदा कनिष्ठ विधान प्रथम मांडतो. उदा० एकदा,

> जर ग सर्व ख च्या अंगी आहे आणि क काही ख च्या अंगी आहे तर ग काही क च्या अंगी आहे
> (An. pr. i. 6 $28^b$ 26) (२३)

अशी दातिसीची मांडणी आहे तर एकदा,

> जर क काही ख च्या अंगी आहे आणि ग सर्व ख च्या अंगी आहे तर ग काही क च्या अंगी आहे
> (२४)

अशी मांडणी आहे. (An. Pr. i. 6 $28^b$ 12)

(२३) मध्ये ज्येष्ठ विधान प्रमथ मांडले आहे तर (२४) मध्ये कनिष्ठ विधान प्रथम मांडले आहे. ह्या आणि इतर अनेक उदाहरणांवरून संविधानाच्या पूर्वांगातील घटक-विधानाचा एकादा विवक्षित क्रम तार्किक दृष्ट्या आवश्यक आहे असे ॲरिस्टॉटलला वाटत नव्हते हे उघड होते.

(४) एवढ्या विवेचनानंतर ॲरिस्टॉटलने 'अनिकेत' अवस्थेत सोडलेल्या चवथ्या आकृतीतील संविधानाची सोय थिओफ्रॅस्टसने कशी केली हे समजून घेता येईल. समजा 'क' हे कनिष्ठ पद आहे आणि 'ग' हे ज्येष्ठ पद आहे, मग ॲरिस्टॉटलच्या व्याख्येप्रमाणे जेव्हा संविधानाच्या पूर्वांगात एका विधा-










नात 'ग' हे मध्यमपदाशी विधेय म्हणून संबंधित असते आणि दुसऱ्या विधानात 'क' हे मध्यमपदाशी उद्देश्य म्हणून संबंधित असते तेव्हा संविधानाची आकृति पहिली असते. जेव्हा, ही दोन्ही पदे विधेय स्थानी असतात तेव्हा ते संविधान दुसऱ्या आकृतीतील असते. आणि जेव्हा ही दोन्ही पदे उद्देश्य स्थानी असतात तेव्हा ती तिसरी आकृती ठरते. ह्या शिवाय, आणखी एक पर्याय शक्य आहे, पण त्याकडे ॲरिस्टॉटलने दुर्लक्ष केले आहे हे आपण पाहिलेच आहे. तो पर्याय म्हणजे 'क' हे पद विधेय ह्मणून आणि 'ग' हे पद उद्देश्य ह्मणून मध्यम-पदाशी संबंधित असणे. जेव्हा संविधानाची घटना अशी असते तेव्हा त्या संविधानाची आकृति चवथी असते. ॲरिस्टॉटलने संविधनांना वेगवेगळ्या आकृतीत विभागून त्यांची जी व्यवस्था लागली आहे तिच्यात ह्या चवथ्या आकृतीतील प्रमाण संविधानांना त्याने स्थान दिले नाही. ह्या संविधानांची सोय थिओफ्रॅस्टस ह्याने लावली, असे वर ह्मटले आहे. ती कशी ते आपल्याला पहायचे आहे. ह्यासाठी थिओफ्रॅस्टस अरिस्टॉटीलिअन आकृतीत आणखी एका चवथ्या आकृतीची भर घालीत नाही. (हा मार्ग गालेन ह्या तत्ववेत्त्याने स्वीकारला असे समजले जाते. पण ह्याचा विचार पुढे करू.) थिओफ्रॅस्टस तीनच आकृतींवर निर्वाह करतो. परंतु ह्या अनिकेत संविधानांची सोय करण्या-साठी तो पहिल्या आकृतीची व्याख्या बदलतो. त्याची व्याख्या अशी : जेव्हा पूर्वांगातील घटक विधानांपैकी एका विधानात मध्यम- पद उद्देश्य -स्थानी असते, आणि दुसऱ्या विधानात ते विध्येय-स्थानी असते तेव्हा त्या संविधानाची आकृति पहिली असते. आता ह्या व्याख्येप्रमाणे 'बार्बारा' ह्या संविधानाची आकृती पहिली आहे; जर (ग सर्व ख च्या अंगी आहे आणि ख सर्व क च्या अंगी आहे) तर ग सर्व क च्या अंगी आहे. (२५)

(२५) च्या पूर्वांगातील एका विधानात मध्यमपद उद्देशय-स्थानी आहे आणि दुसऱ्या विधानात ते विध्येय-स्थानी आहे. पण आता पुढील संविधान पहा : जर (ख सर्व ग च्या अंगी आहे आणि क सर्व ख च्या अंगी आहे) तर ग काही क च्या अंगी आहे. (२६)

आता (२६) च्या पूर्वांगात एका विधानात मध्यम-पद उद्देश्यस्थानी आहे आणि दुसऱ्या विधानात विधेय-स्थानी आहे, तेव्हा (२६) हे संविधान मुद्दा ह्या व्याख्येप्रमाणे पहिल्या आकृतीत आहे. हे संविधान म्हणजे चवथ्या आकृतीतील 'ब्रामान्तिप्'. आता पूर्वांगातील घटक-विधाने कोणत्याही क्रमाने मांडली गेली तरी संविधानाचे प्रामाण्य अबाधित रहाते हे आपण पाहिलेच आहे. तेव्हा (२६) पुढे दिल्याप्रमाणे लिहिता येईल.

जर (क सर्व ख च्या अंगी आहे आणि ख सर्व ग च्या अंगी आहे.) तर ग काही क च्या अंगी आहे. (२७)

त्याचप्रमाणे एखाद्या विधान-रूपातील एका चर-चिन्हाच्या ठिकाणी दुसऱ्या चरचिन्हाची बदली करता येते हे आपण पाहिलेच आहे. तेव्हा, (२७) मध्ये 'क' ऐवजी 'ग' आणि 'ग' ऐवजी 'क' ही अक्षरे योजिली तर (२७) चे रूप असे होते : जर (ग सर्व ख च्या अंगी आहे आणि ख सर्व क च्या अंगी आहे) तर क काही ग च्या अंगी आहे. (२८)

आता (२८) आणि (२५) ह्यांची तुलना केली तर असे आढळून येईल की त्यांचे पूर्वांग एकच आहे पण एका संविधानात ह्या पूर्वांगापासून 'ग सर्व क च्या अंगी आहे' असे निष्पन्न करण्यात आले आहे तर दुसऱ्या संविधानात 'क काही ग च्या अंगी आहे' हे विधान निष्पन्न करण्यात आले आहे. म्हणजे, (२५) मध्ये 'ग' हे ज्येष्ठ पद आहे आणि 'क' हे कनिष्ठ पद आहे तर (२८) मध्ये 'क' हे ज्येष्ठ पद आहे आणि 'ग' हे कनिष्ठ पद आहे. पण पदांची 'ज्येष्ठ' व 'कनिष्ठ' ही स्थाने 'सांकेतिक' असल्यामुळे त्यांच्या-कडे दुर्लक्ष केले तर संविधानाच्या आकृतिभेदाची व्यवस्था अशी लावता येईल : जेव्हा संविधानाच्या पूर्वांगात (कोणत्या तरी) एका घटक विधानात मध्यम-पद उद्देश्य-स्थानी आणि दुसऱ्या घटक विधानात विधेय-स्थानी असते आणि उरलेल्या दोन पदांचा परस्पर-संबंध संविधानाच्या उत्तरांगात जोडलेला असतो तेव्हा त्या संविधानाची आकृति पहिली असते. त्याचप्रमाणे, जेव्हा पूर्वांगाच्या दोन्ही घटकविधानात मध्यम-पद विधेय स्थानी असते आणि त्याच्या उत्तरांगात उरलेल्या







दोन पदांचा परस्पर-संबंध जोडलेला असतो तेव्हा त्या संविधानाची आकृति दुसरी असते. ह्याच रीतीने संविधानाच्या तिसऱ्या आकृतीचीही व्याख्या देता येईल. ह्या व्याख्या स्वीकारल्या तर तीन आकृतींमध्ये सर्व प्रमाणसंविधानांची व्यवस्था लावता येईल. थिओफ्रॅस्टसने स्वीकारलेला मार्ग असा आहे.

उलट, गालेनने एक वेगळाच मार्ग स्वीकारला असा समज प्रचलित आहे. पहिल्या आकृतीची ॲरिस्टॉटलने केलेली व्याख्या गालेनने कायम ठेवली पण वगळल्या गेलेल्या संविधानांची सोय करण्यासाठी एक चवथी आकृति कल्पिली – ज्या संविधानाच्या पूर्वांगात ज्येष्ठ पद उद्देश्य-स्थानी आणि कनिष्ठपद विधेय-स्थानी असते अशा संविधानांची चवथी आकृति कल्पिली– असे मानले जाते. ह्या समजुतीत किती तथ्य आहे ?

प्रान्ट्ल ( Prantl ) ह्या तर्कशास्त्राच्या इतिहासकाराच्या म्हणण्याप्रमाणे चवथ्या आकृतीचा शोध गालेनने लावला असा उल्लेख इब्न रशीद ह्या तत्त्वतेत्त्याच्या ग्रंथात आढळतो आणि मध्ययुगीन तर्कशास्त्रज्ञांमध्ये इब्न रशीदमुळे ही समजूत फैलावली. पण गालेनच्या उपलब्ध ग्रंथात किंवा इतर ग्रीक भाष्यकारांच्या अवशिष्ट लिखाणात ह्या समजुतीला आधार मिळत नाही. ह्याच्या उलट मॅक्झिमिलिअन वॉलिस ह्यांनी Prior Analytics वरील आमोनिअसच्या भाष्याबरोबर एका अज्ञात भाष्यकाराचे एक भाष्य प्रसिद्ध केले आहे. ह्या भाष्याच्या योगाने ह्या सर्व प्रश्नावर एक वेगळाच प्रकाश पडतो. ह्या भाष्याचा मथळा 'संविधानाच्या सर्व प्रकारांविषयी' ( On all the kinds of Syllogism ) असा आहे हा भाष्यकार म्हणतोः

'... केवळ संविधानाचे ( Categorical Syllogism) दोन प्रकार आहेत : साधी ( Simple ) आणि जटिल (Compound). साध्या संविधानाच्या तीन जाती आहेत. त्या म्हणजे पहिली, दुसरी आणि तिसरी आकृती. जटिल संविधानाच्या चार जाति आहेत : पहिली, दुसरी, तिसरी आणि चवथी आकृति. ( संविधानाच्या ) फक्त तीन आकृति असतात असे ॲरिस्टॉटल म्हणतो. कारण तो फक्त तीन पदांनी बनलेल्या साध्या संविधानाचाच विचार करतो. पण गालेन आपल्या Apodeictic मध्ये चार आकृति आहेत असे म्हणतो. कारण चार पदांच्या जटिल संविधानाचा तो विचार करतो. अशी अनेक संविधाने त्याला प्लेटोच्या संवादात आढळली आहेत. " साध्या संविधानांच्या ( ॲरिस्टॉटीलिअन ) आकृतीचा परस्पराशी पुढील प्रकारे संयोग करून जटिल संविधाने प्राप्त होतात. १ आणि १ , १ आणि २ , १ आणि ३ , २ आणि १ , २ आणि २ , २ आणि ३ , ३आणि १, ३ आणि २, ३ आणि ३. ह्या पैकी २ आणि २, व ३ आणि ३ ह्या संयोजनांनी प्रमाण संविधाने प्राप्त होत नाहीत. उरलेल्या सात संयोजनांपैकी २ आणि १ , आणि १ आणि २ , ही संयोजने एकच आकृति उपलब्ध करून देतात; त्याचप्रमाणे, १ आणि ३ व ३ आणि १ , ३ आणि २ व २ आणि ३ ही संयोजने एक एक आकृति निष्पन्न करतात. तेव्हा जटिल संविधानाच्या १ आणि १ , १ आणि २ , १ आणि ३ , व २ आणि ३ अशा चार आकृति शक्य आहेत.

आता, ह्या उताऱ्याचा उलगडा केला पाहिजे. जटिल संविधानात चार पदे असतात; त्यांपैकी दोन 'ख' आणि 'ग' म्हणा, 'मध्यमपदे' असतात. पूर्वांगात तीन घटक विधाने असतात. ज्या घटक विधानात 'ख' आणि 'ग' ही पदे येतात त्या विधानाला मध्यम विधान म्हणू या. समजा, उत्तरांगाचे उद्देश्य 'क' आहे आणि विधेय 'ध' आहे. तर मग ज्या विधानात 'क' आणि 'ख' ही पदे येतात त्या विधानाला कनिष्ठ विधान म्हणू या आणि ज्या विधानात 'ग' आणि 'ध' ही पदे येतात त्याला ज्येष्ठ विधान म्हणू या ( आपल्या नेहमीच्या व्याख्येप्रमाणे 'क' आणि 'ग' ही अनुक्रमे कनिष्ठ व ज्येष्ठ पदे होत. ) मग चार विधानांच्या बनलेल्या ह्या जटिल संविधानात पदांच्या











पुढील आठ रचना शक्य आहेत.※ ( सर्व विधानात पहिले पद उद्देश्य आहे व दुसरे विधेय आहे. ) वरील तक्त्यात आ १ मध्ये कनिष्ठ आणि मध्यम विधानातील पदांची रचना क – ख, ख -ग अशी आहे. ह्या दोन विधानांपैकी एका विधानात मध्यम - पद उद्देश्य आणि दुसऱ्या विधानात विधेय आहे. तेव्हा ही दोन विधाने पहिल्या आकृतीत आहेत. त्याचप्रमाणे ( आ १ मधली ) मध्यम व ज्येष्ठ विधाने घेतली तर तीही ह्याच कारणांमुळे पहिल्या आकृतीत आहेत. तेव्हा आ १ हे संयोजन १ आणि १ असे आहे. पण आता आ ३ घ्या. आ ३ मधील कनिष्ठ व मध्यम विधाने दुसऱ्या आकृतीत आहेत. ( कारण मध्यम–पद दोन्ही विधानात विधेय-स्थानी आहे. ) पण मध्यम व ज्येष्ठ विधान ही तिसऱ्या आकृतीत आहेत. ( कारण ' ग ' हे मध्यम-पद दोन्ही विधानात उद्देश्य आहे. ) तेव्हा आ ३ हे संयोजन तिसऱ्या आकृतीत आहे. इतर सर्व आकृतींचाही असाच उलगडा करावा.

येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे, ती ही की आपण थिओफ्रॅस्टसच्या तत्त्वाला अनुसरून संविधानाची आकृति ठरवीत आहो. ह्या तत्त्वाप्रमाणे, संविधानाची आकृती संविधानाच्या पूर्वांगात इतर पदांचे मध्यम-पदाशी जे संबंध असतील त्यांच्यावरून सर्वस्वी निश्चित होत असते. ह्या इतर पदांचा संविधानाच्या उत्तरांगात परस्परांशी कसाही संबंध जोडलेला असला म्हणजे त्यांच्यापैकी कोणतेही पद उत्तरांगात उद्देश्य किंवा विधेय असले, किंवा ज्येष्ठ किंवा कनिष्ठ असले तरी त्यामुळे संविधानाच्या आकृतीत फरक घडून येत नाही. आता, वर दिलेल्या तक्त्यात आपण शेवटचा स्तंभ पाहिला तर त्याच्यात २ आणि २, किंवा ३ आणि ३ ही आकृति-संयोजने आढळून येत नाही ह्याचे कारण उघड आहे. उदा० जर २ आणि २ हे आकृति-संयोजन शक्य असायचे असेल तर पूर्वांगातील तीनही घटक-विधानात एकच पद विधेय-स्थानी असावे लागेल. ही गोष्ट अशक्य आहे. तीच गोष्ट ( आवश्यक तो फरक करून ) ३ आणि ३ ह्या विषयी म्हणता येईल. आता आ ४ हे आकृति-संयोजन घ्या. त्यातील पदांचे संबंध असे आहेत :

| आकृति | कनिष्ठ | मध्यम विधान | ज्येष्ठ | उत्तरांग | |
|---|---|---|---|---|---|
| आ १ | क–ख | ख–ग | ग–घ | क–घ | १ आणि १ |
| आ २ | क–ख | ख–ग | घ–ग | क–घ | १ आणि २ |
| आ ३ | क–ख | ग–ख | ग–घ | क–घ | २ आणि ३ |
| आ ४ | क–ख | ग–ख | घ–ग | क–घ | २ आणि १ |
| आ ५ | ख–क | ख–ग | ग–घ | क–घ | ३ आणि १ |
| आ ६ | ख–क | ख–ग | घ–ग | क–घ | ३ आणि २ |
| आ ७ | ख·क | ग–ख | ग–घ | क–घ | १ आणि ३ |
| आ ८ | ख–क | ग–ख | घ–ग | क–घ | १ आणि १ |





अनुक्रमणिका

क-ख, ग-ख, घ-ग, क-घ (२९) पूर्वांगातील विधानांचा क्रम बदलता येतो. तेव्हा (२९) असे लिहिता येईल :

घ-ग, ग-ख, क-ख, क-घ (३०) त्याचप्रमाणे चर-चिन्हांची अदलाबदल करता येते. तेव्हा 'क' आणि 'घ' ह्या अंत्य पदाची अदलाबदल केली आणि त्याचप्रमाणे 'ख' आणि 'ग' ह्या मध्यम-पदाची अदलाबदल केली तर (३०) चे स्वरूप असे होते :

क-ख, ख-ग, घ-ग, घ-क (३१).

आता (३१) व आ$_{२}$ ह्यांची तुलना केली तर दोहोमध्ये पूर्वांगाची पदरचना एकच आहे हे दिसून येईल. ह्या दोहोत जो फरक आहे तो फक्त उत्तरांगातील पदांच्या स्थानात. तेव्हा थिओफ्रॅस्टसच्या तत्त्वाप्रमाणे आ$_{२}$ आणि आ$_{४}$ ह्या आकृति संयोजनानी प्राप्त होणारी (जटिल) संविधानाची आकृति एकच आहे. हीच गोष्ट आ$_{१}$ व आ$_{८}$, आ$_{३}$ व आ$_{६}$ आणि आ$_{५}$ व आ$_{७}$ ह्यांच्या बाबतीत पण खरी आहे. जटिल संविधानाच्या अशा रीतीने चार आकृति ठरतात. गालेनच्या चार आकृति त्या ह्या होत. 'साध्या' संविधानाची एक चवथी आकृति गालेनने काल्पली ह्या म्हणण्याला पुरावा नाही.

---





अनुक्रमणिका








# भारतीय राज्यघटनेचे एक वैशिष्ट्य *

* [ प्राज्ञपाठशाळेच्या चालू वर्षाच्या सरस्वत्युत्सवात पत्रपंडित श्री. पां. वा. गाडगीळ यांनी दि. ७ ऑक्टो. १९६२ रोजी वाई येथे दिलेल्या व्याख्यानाचा सारांश ].

"भारतीय राज्यघटनेतला एक वादग्रस्त विषय निवळ तात्त्विक चर्चेच्या दृष्टीने मी येथे मांडणार आहे. या मुद्यावर पं. नेहरूंच्या मताहून वेगळे मत मी मांडणार आहे, याचा अर्थ मी नेहरूंच्या राजकीय धोरणाचा विरोधक आहे असा कोणी करू नये. मी गेली तीस वर्षे नेहरूंच्या धोरणाचे समर्थन करीत आलो आहे. पण हा विषय नेहरूंच्या धोरणासंबंधीचा नसून राज्य-घटनेच्या अर्थासंबंधीचा आहे. या अर्थाची चर्चा निवळ तात्त्विक दृष्टीने पण मनमोकळेपणे होणे अत्यवश्य आहे.

## राष्ट्रपति आणि पंतप्रधान

भारताच्या राज्यघटनेतील राष्ट्रपती व पंतप्रधान यांचे परस्पर नाते कोणते, या दोघात श्रेष्ठ कोण, या मुख्य मुद्यातून इतरही महत्त्वाचे मुद्दे निघणार आहेत. डॉ. राजेंद्रबाबू राष्ट्रपती असताना त्यांनी कायदे पंडितांच्या एका सभेत एक भाषण केले. त्या भाषणात त्यांनी भारतीय राज्यघटनेतल्या राष्ट्रपतीच्या अधिकारासंबंधाने चर्चा करून कायद्याच्या दृष्टीने मतप्रदर्शन व्हावे अशी सूचना केली. सदर सभेत त्या मुद्यावर आणखी चर्चा झाली नाही. पण देशात या विषयाचा फार खल झाला. पं. नेहरूंनी या मुद्यासंबंधाने आपले जे मत मांडले ते पुढील आशयाचे " भारतातील राष्ट्रपती हा इंग्लंडच्या राजासारखा नुसता नामधारी राहील. घटनेतले शब्द काहीही असले तरी इंग्लंडातल्या प्रमाणे येथे पंतप्रधान व मंत्रिमंडळ हेच श्रेष्ठ राहून राष्ट्रपती हा नामधारी राहावा अशी व्यवस्था तसे प्रघात निर्मून करता येईल. "

## नेहरूंचे मत निराधार

नेहरूंचे हे मत शास्त्र व वस्तुस्थिति यांना धरून नाही. कारण इंग्लंडात घटना ही लिहून मंजूर केलेली नसल्याने तेथे प्रघात पाडता येतात. पण भारतातली घटना घटनासमितीने लिहून मंजूर केली असून तिचा अर्थ लावण्याचे काम अत्युच्च न्यायालयाकडे देण्यात आले आहे. घटनेच्या शब्दार्थाहून वेगळे असे प्रघात पाडले गेले तर न्यायालय लिखित घटनाच मानील व त्याहून वेगळे असणारे प्रघात नामंजूर करील. म्हणून राष्ट्रपती व पंतप्रधान यांच्या संबंधाविषयी इंग्लडची पद्धति विचारात न घेता राज्यघटनेत शब्द काय आहेत हे पाहिले पाहिजे. भारतीय राज्यघटनेच्या ५३ ( १ ) या पोटकलमात

" राष्ट्रपती हा प्रत्यक्षपणे ( डायरेक्ट्‌ली ) अथवा आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांमार्फत अप्रत्यक्षपणे ( इनूडायरेक्ट्‌ली ) या राज्यघटनेला अनुसरून अमलबजावणीचा अधिकार चालवील " असे म्हटले आहे. ७५ ( १ ) या पोटकलमाप्रमाणे पंतप्रधानाची नेमणूक राष्ट्रपतीने करायची असून इतर मंत्र्यांची नेमणूक राष्ट्रपतीने पंतप्रधानाच्या सल्ल्यावरून करावयाची आहे. ७५ ( ३ ) या पोटकलमाप्रमाणे मंत्रिमंडळ हे सामुदायिक रीत्या लोकसभेला जबाबदार राहील. पण ७५ ( २ ) या पोटकलमाप्रमाणे कोणत्याही मंत्र्याचे स्थान राष्ट्रपतीची इच्छा असेल तोवरच त्याच्याकडे राहील.

## घटनेतील कलमांचा अर्थ

वरील कलमांचा संकलित परिणाम असा आहे की राष्ट्रपतीने मंत्रिमंडळाचा सल्ला घेऊन, पण तो सल्ला ऐकून अथवा न ऐकताही, स्वतः प्रत्यक्षपणे पार्लमेंटच्या कायद्याची बजावणी करायचे ठरविले तर राज्यघटनेप्रमाणे त्याचे तसे करणे हे कायदेशीर ठरेल. अर्थात् पार्लमेंटचाच विरोध राष्ट्रपतीला झाला तर राष्ट्रपती स्वतः प्रत्यक्षपणे राज्यकारभार करू शकणार नाही. उदाहरणार्थ, मंत्रिमंडळाला लोकसभेच्या बहुमताचा पाठिंबा असणे अवश्य आहे. पण या मंत्रिमंडळाला राष्ट्रपती हा नामधारीच राहावा, त्याने प्रत्यक्ष राज्यकारभार करू नये असे जर वाटत असेल तर हे मंत्रिमंडळ 'राष्ट्रपतीने घटनाभंग केला' असे राज्यघटनेच्या ६१ कलमाप्रमाणे








पार्लमेंटमार्फत ठरवून राष्ट्रपतीला पदच्युतही करू शकेल. आज परिस्थिति अशी आहेच. आज लोकसभेत काँग्रेस मंत्रिमंडळाला लोकमताचा प्रचंड पाठिंबा असल्याने राष्ट्रपती नामधारी न राहता सत्ता गाजवू इच्छील तर आजचे काँग्रेससरकार त्या राष्ट्रपतीवर पार्लमेंटपुढे घटनाभंगाचा आरोप करून त्याला पदच्युत करील. यामुळे पं. नेहरूंनी राज्यघटनेचा जो अर्थ केला आहे त्याला आजच्या स्थितीत प्रत्यवाय येणार नाही. पण आजचीच परिस्थिति भावी कालात अशीची अशी राहील असे म्हणता येणार नाही.

## दोघांची निवड कशी होते ?

येथे राष्ट्रपती व पंतप्रधान कसे निवडले जातात हे समजून घेणे हे महत्त्वाचे आहे. पंतप्रधान हा मूळचा लोकसभेचा एक सभासद असतो. तो लोकसभेच्या पाचशे मतदार संघापैकी फक्त एकातून निवडला जातो. पुढे लोकसभेतल्या बहुमतवाल्या पक्षाने त्याला आपला पुढारी म्हणून निवडले म्हणजे राष्ट्रपती त्याला पंतप्रधान करतो. पण राष्ट्रपती कसा निवडला जातो ? देशातील साडेअठरा कोटी मतदारांनी सर्व राज्यातील सभांचे निवडलेले दोन अडीच हजार प्रतिनिधि व पार्लमेंटचे साडेसातशे प्रतिनिधि अशा सबंध देशाच्या सुमारे तीन हजार प्रतिनिधींकडून राष्ट्रपती निवडला जातो. म्हणजे पंतप्रधान हा फक्त एका लोकसभामतदार संघातून निवडला जातो व नंतर लोकसभेतल्या बहुमतवाल्या पक्षाकडून पुढारी निवडला गेल्यामुळे राष्ट्रपती त्याला पंतप्रधान करतो, तर राष्ट्रपती हा साऱ्या देशातल्या तीन हजार लोकप्रतिनिधींकडून निवडला जातो. म्हणजे पंतप्रधानाची निवड अगदी संकुचित क्षेत्रातून होत असून राष्ट्रपतीची निवड साऱ्या राष्ट्राएवढया विशाल भूमिकेतून होते. असा हा राष्ट्रपती निव्वळ नामधारीच असावा व पंतप्रधान हाच खरा सत्ताधारी मानला जावा हा घटनेतील शब्दाचा व हेतूचा विपर्यासच ठरेल.

एखादा राष्ट्रपती घटनेच्या १४३ कलमाप्रमाणे अत्युच्च न्यायालयापुढे दावा मांडून ' राष्ट्रपती प्रत्यक्षपणे आपले अमलबजावणी अधिकार चालवू शकेल की नाही ' असा प्रश्न उपस्थित करील तर न्यायालयाला राज्यघटना कलम ५३ ( १ ) अन्वये वरील प्रश्नाचे उत्तर होकारार्थीच द्यावे लागेल.

## काँग्रेस पक्षाचे बळ चिरंतन नाही

शिवाय वर ध्वनित केल्याप्रमाणे आज काँग्रेसला जसे लोकसभेत प्रचंड मताधिक्य आहे व म्हणून ६१ कलमाप्रमाणे काँग्रेस राष्ट्रपतीला पदच्युत करू शकते, अशी परिस्थिति भविष्य कालात नेहमीच राहील असे मानता येणार नाही. निरनिराळ्या राज्यात निरनिराळ्या पक्षाचे बहुमत होऊन निरनिराळ्या पक्षाची मंत्रिमंडळे अधिकारावर येणार नाहीत असे नाही. या परिस्थितीची छाया लोकसभेतही पडलेली असेल. समजा, लोकसभेत ४५ टक्के सभासदांचा पाठिंबा एका पक्षास असेल, दुसऱ्या एका पक्षास ३५ सभासदांचा पाठिंबा असेल, आणि तिसऱ्या पक्षास २० सभासदांचा पाठिंबा असेल, तर ४५ सभासदांचा पाठिंबा असणाऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यास राष्ट्रपती पंतप्रधान नेमील आणि पार्लमेंट बरखास्त होऊन पुन्हा निवडणुकी करण्याची पाळी येऊ नये यासाठी बहुसंख्य सदस्य मंत्रिमंडळाला पाठिंबा देत राहतील. पण त्याच बरोबर बोलून चालून अल्पसंख्य पक्षाला सर्वसत्ता देण्याऐवजी सर्व राष्ट्रांतील लोकप्रतिनिधींनी निवडून दिलेल्या व पाच वर्षे पर्यंत अधिकारपदावर राहणार असल्यामुळे पक्षातीत अशा राष्ट्रीय भूमिकेवरून काम करू शकणाऱ्या राष्ट्रपतीनेच सत्ता चालवावी व मंत्रिमंडळाला सर्व पक्षाच्या विचाराने राज्य करण्याला राष्ट्रपतीने भाग पाडावे असे जर विरोधी पक्षांना वाटेल तर ६१ कलमाप्रमाणे राष्ट्रपतीला पदच्युत करण्याला विरोधी पक्ष पाठिंबा देणार नाहीत व मंत्रिमंडळाला राष्ट्रपतीच्या विचारानेच राज्यकारभार चालवावा लागेल.

असे करणे घटनेला धरूनही होईल. माझ्यामते घटनेचा हेतु असाच आहे व सुप्रीम कोर्टापुढे हा वाद गेल्यास ५३ ( १ ) पोट कलमाचा अर्थ सुप्रीम कोर्ट मी करतो असाच करील याबद्दल मला मुळीच संशय नाही.

## यात गैर काय आहे ?

अशा प्रकारे राष्ट्रपती हा पंतप्रधानापेक्षा श्रेष्ठ ठरला तर मोठेसे गैर होईल असेही मला वाटत नाही. राष्ट्रपती अथवा पंतप्रधान यांपैकी कोणाचाही प्रभाव

चालून अथवा दोघांच्या एकमेकावरील दडपणाने लोकशाही नांदावी असा सोयस्कर लवचीकपणा भारतीय घटनेत आणला गेला आहे हा आमच्या घटनेचा एक गुणविशेषच होय.

## अमेरिकेतील संभाव्य पेचप्रसंग

अमेरिकेचे अध्यक्ष आयसेनॉर आपल्या अध्यक्षपदाच्या अमदानीत एकदा मेंदूच्या दुखण्याने अजारी झाले व त्यांची विचार करण्याची शक्तीच बधिर झाली. त्यांनी प्रकृती चांगली असता उपराष्ट्रपतीला आपल अधिकार दिले नव्हते. अशा स्थितीत राष्ट्रपतिपद निष्क्रिय राहून अमेरिकन राज्यघटनेवर मोठे संकट आले होते. अमेरिकेत राष्ट्रपतीचे मंत्रिमडळ तेथल्या पार्लमेंटातले म्हणजे काँग्रेसमधले नसते. यामुळे तो पेचप्रसंग आला होता. पुढे आयसेनॉर बरे झाल्याने ती अडचण निवारली गेली. भारतात असा प्रसंग आल्यास मंत्रिमंडळ पार्लमेंटात असल्याने राष्ट्रपतीचे अधिकार मंत्रिमंडळ चालवू शकेल.

## इंग्लंडात तसे नाही

इंग्लंडात बहुमतवाल्या पक्षाचे मंत्रिमंडळ असते. पण बहुमताचा पाठिंबा केव्हाही नाहीसा झाला की मंत्रिमंडळ कोसळते. यामुळे पंतप्रधानाच्या हाती एक दहशतीचा चाबूक राहतो. स्वपक्षालाही विश्वासात न घेता राजीनाम्याची धमकी देऊन तो पार्लमेंटातले बहुमत आपल्या बाजूस नेहमी हुकुमी ठेवू शकतो. मंत्र्यांना काढणे अथवा नेमणे हे पंतप्रधानाच्या इच्छेवर अवलंबून असल्याने सकशीतल्या जनावराप्रमाणे तो सर्व सहकाऱ्यांना वागवू शकतो. यामुळे इंग्लंडातला पंतप्रधान केव्हाही हुकुमशहा होऊ शकेल. पण भारतातला राष्ट्रपती पाच वर्षे अधिकारावर ठामपणे राहणार असल्यामुळे पंतप्रधानाच्या हुकुमशाहीला, स्वतः पक्षातीत राहून आळा घालू शकेल. पंतप्रधानाच्या पाठीशी केवढेही बहुमत असले तरी अल्पसंख्याकांना राष्ट्रपतीकडे दाद मागता येईल. इंग्लंडची राज्यघटना दोनच पक्ष असताना चांगली चालेल. पण भारतासारख्या बहुभाषी, बहुजाति, बहुधर्मी व मागासलेल्या देशात एकच प्रभावी पक्ष न राहता अनेक लहान लहान पक्ष निर्माण होणे भावि कालात शक्य आहे. अशा स्थितीत पं. नेहरू, राजेंद्र प्रसाद, यासारखे सर्व राष्ट्राला आदरणीय ठरणारे थोर राष्ट्रपुरुष एखाद्या पक्षातर्फे पंतप्रधान होण्यापेक्षा राष्ट्रपती म्हणून देशातल्या सर्व प्रतिनिधींकडून निवडून येतील व ते राष्ट्रहित साधू शकतील. भारतीय राज्यघटनेचा दृष्टिकोन असाच आहे व त्या हेतूनेच ५३ ( १ ) कलमाची शब्दयोजना स्पष्टपणे केली आहे असे मला वाटते.

जाता जाता एका शंकेचे निराकरण कल पाहिजे की भारताचा राष्ट्रपती हुकुमशाहा कधीच होऊ शकणार नाही. कारण तो पार्लमेंट रद्द करू शकत नाही. त्याला घटनेप्रमाणेच राज्य करावे लागले. ८५ ( १ ) या पोटकलमाप्रमाणे त्याला दर सहा महिन्यांपूर्वी पालमट बोलवावेच लागते. त्याने असे पार्लमेंट बोलाविलेच नाही तर ? सुप्रीम कोर्टात दावा करता येईल ! तरीही त्याने ऐकले नाही तर काय करायचे ही तरतूद मात्र घटनेत नाही. मग स्वत: लोकसभापती पार्लमेंट बोलावील व मग ते इंग्लंडात १६४० त घडले त्याप्रमाणे पार्लमेंटचे बंड ठरेल.

---











# दाद्रीचा रस्ता

**दाद्री**—उत्तर प्रदेशातील अलाहाबाद जिल्ह्यातले हे एक छोटे गाव; काळाच्या मागे पडलेले; नवयुगातल्या प्रगतीच्या सूर्याची किरणे तोंवर त्या गावापर्यंत पोहोचली देखील नव्हती. भोवतालच्या जगाशी संबंध जोडणारा साधा रस्ताहि तेथे नव्हता; आणि गावकऱ्यांना त्याची गरज कधी वाटली नाही;



**पण नंतर जमाना बदलला.** इतर अनेक गावांप्रमाणेच दाद्री गाव जागे झाले. नियोजनामुळे प्राप्त होत असलेल्या प्रगतीच्या पावलांची चाहूल गावकऱ्यांना लागली, शेतकरी आपल्या शेतांवर जास्त खपू लागले; नव्या पद्धतीने मशागत करू लागले; त्यामुळे जमीनींतून जास्त पीकपाणी हाती येऊ लागले. ऊंसांच्या मळयांतून ऊंस भरघोस निघू लागला. साखरेच्या कारखान्यांत तो नेण्यासाठी चांगल्या रस्त्याची गरज शेतकऱ्यांना पटली.

दाद्रीचे गावकरी मग एकत्र आले, रस्ता करण्याचे त्यांनी मनावर घेतले. नजीकच्या मोठया, रहदारीच्या रस्त्याला जोडणारा एक सरळ मार्ग त्यांनी आखला. तो ज्याच्या ज्याच्या शेंतावरून गेला त्या त्या शेतकऱ्याने तेवढी जमीन देणगी म्हणून जाहीर केली. आणि रस्ता तयार झाला. **विकासकार्याचे महत्व लोकांना कळून आले. भरभराटीची आशाकिरणे त्यांच्या मनांत चमकू लागली.**

**नवे रस्ते ग्रामीण भारताला नवे रूप देत आहेत. त्यामुळे ग्रामीण भागाचा शहरांशी व तेथील प्रगतीशी निकटचा संबंध येत आहे. नवे रस्ते म्हणजे जणू भरभराटीकडे नेणारे मार्गच ठरत आहेत. नियोजनाच्या पहिल्या दशकात भारतातील साध्या, कच्चा रस्त्यांची एकूण लांबी १,५१,००० मैलांवरून २,५०,००० मैलांवर गेली आणि पूर्वी फक्त ९७,५०० मैल लांबीचे पक्के रस्ते होते त्यांच्या जागी आज १,४४,००० मैलांचे तसे रस्ते आहेत. तिसऱ्या योजनेच्या कालावधीत आणखी २५,००० मैल लांबीचे नवे पक्के रस्ते तयार होतील आणि त्याशिवाय साध्या रस्त्यांच्या एकूण लांबीमध्येहि भरपूर वाढ केली जाईल.**

**तृतीय पंचवार्षिक योजना**

# प्रत्येकासाठी समृद्ध जीवन

D.A 62/408

# युरोपीय सामायिक बाजारपेठ व कम्युनिस्ट

कार्ल मार्क्सने आपल्या ग्रंथात भांडवलशाहीच्या विकासाचे आणि अंतिम ऱ्हासाचे विवेचन केले आहे, ते गेल्या शतकाच्या पूर्वार्धातील प्रस्थापित समाजव्यवस्थेच्या निरीक्षणावर आधारलेले होते. या समाजव्यवस्थेतील भांडवलशाही ही प्राथमिक अवस्थेतील व नवोदित अशी होती. त्या समाजव्यवस्थेत संरजामशाहीचे अवशेषही प्रभावीपणे आढळत होते, आणि तिच्यात राजकीय लोकशाहीचा देखील अजून प्रभाव पडावयाचा होता. मध्ययुगीन संरजामशाहीचा अस्त आणि आधुनिक औद्योगिक भांडवलशाही उत्पादनव्यवस्थेचा उगम यांच्या या संधिकालातील समाजव्यवस्थेच्या अभ्यासावर आधारलेले मार्क्सचे भांडवलशाही बाबतचे विवेचन साहजिकच अपुरे व एकांगी ठरले. पण मार्क्सच्या विवेचनाचा चिकित्सक बुद्धीने अभ्यास करून त्यातील उणीवा दूर करण्याचा प्रयत्न करण्याऐवजी कम्युनिस्टांनी मार्क्सला आपले कुलदैवत बनवले आणि मार्क्सवादाचा पोथीनिष्ठ संप्रदाय निर्माण केला.

मार्क्सने भांडवलशाही अर्थव्यवस्थेत दिवसेदिवस कामगार अधिकच गरीब होतील व मालकवर्ग अधिकच श्रीमंत बनेल आणि या परस्परविरोधी वर्गांच्या दिवसेदिवस तीव्र होणाऱ्या लढ्यात अखेरीस भांडवलशाही गाडली जाईल असे भाकित वर्तविले. मार्क्सच्या विवेचनाच्या आधारे लेनिनने भांडवलशाही व्यवस्थेची अत्युच्च अवस्था म्हणजे साम्राज्यवाद हा निष्कर्ष काढला व भांडवलशाही व साम्राज्यवाद अस्तित्वात असेतोपर्यंत भांडवलशाही राष्ट्रातील संघर्ष व युद्धे ही अपरिहार्य आहेत असे निदान केले.

## कम्युनिस्टांची पोथीनिष्ठा

मार्क्स आणि लेनिन यांच्या विवेचनात पुष्कळच तथ्यांश होता, यात शंका नाही; आणि त्यांचे अर्थशास्त्र व समाजशास्त्र या क्षेत्रातील श्रेष्ठत्वही कोणी नाकारणे शक्य नाही. पण त्यांच्या विवेचनातील ग्राह्यांश स्वीकारून बदलत्या परिस्थितीनुसार त्यात सुधारणा करण्याऐवजी कम्युनिस्टांनी मार्क्स व लेनिन यांच्या विवेचनाला त्रिकालाबाधित सत्याचे स्वरूप दिले आणि जेथे मार्क्स-लेनिन यांचे विवेचन व वस्तुस्थिती यांच्यात तफावत असेल तेथे मार्क्स-लेनिनवादात सुधारणा करण्याऐवजी वस्तुस्थितीलाच विकृत स्वरूप देण्याचा प्रयत्न केला.

## मार्शल योजनेचा रशियन अर्थ

उदाहरणार्थ, दुसऱ्या महायुद्धानंतर पश्चिम युरोपातील उध्वस्त राष्ट्रांना युद्धोत्तर पुनर्रचनेसाठी मदत म्हणून अमेरिकेने मार्शल योजना आखली व तिच्यामार्फत १५ हजार कोटी रुपयांपेक्षा अधिक आर्थिक साहय्य त्या राष्ट्रांना दिले. पण या मार्शल योजनेबद्दल रशियन आणि इतर कम्युनिस्टांचे काय मत होते? १९५५ साली या योजनेची यशस्वीपणे सांगता झाली होती आणि पश्चिम युरोपातील राष्ट्रे आर्थिक प्रगतीचे आश्चर्यकारक टप्पे गाठीत होती. अशा वेळी सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाने प्रसिद्ध केलेल्या "राजकीय अर्थव्यवस्था" या अधिकृत ग्रंथात मार्शल योजनेचा परिणाम खालील प्रमाणे वर्णन करण्यात आला होता:

"१९४८–५२ या काळात मार्शल योजनेचे पश्चिम युरोपातील राष्ट्रांना अमेरिकेचे गुलाम बनवणे, त्यांची अर्थव्यवस्था व उद्योगधंदे नेस्तनाबूत करणे, अमेरिकेला नको असलेला माल त्यांच्यावर लादण्यासाठी त्यांना अमेरिकन मालाचे कोठार बनवणे, व त्यांचे सार्वभौमत्व हिरावून घेणे हे उद्दिष्ट होते."

या सारखी अनेक हास्यास्पद विधाने या ग्रंथात अनेक ठिकाणी आढळतात. उदाहरणार्थ, अमेरिका व ब्रिटन या प्रमुख भांडवलशाही राष्ट्रांमधील संघर्ष दिवसेंदिवस तीव्र होत जाईल व त्याचे पर्यवसान "या भांडवलशाही राष्ट्रांमध्ये युद्ध होण्यात" होईल, असेही बाष्कळ विधान या ग्रंथात केलेले आढळते. अमेरिका, ब्रिटन, इटली, फ्रान्स व पश्चिम जर्मनी या राष्ट्रांतील जनतेच्या रहाणीच्या मानाबद्दल या ग्रंथांत पुढील प्रमाणे विवेचन करण्यात आले होते.

"या देशातील कामगारवर्गाच्या होणाऱ्या वाढत्या पिळणुकीमुळे कामगारांचे जीवनमान उत्तरोत्तर खालावतच चालले आहे. त्याचबरोबर सार्वत्रिक बेकारीच्या कायम अस्तित्वामुळे कामगारांचा रहाणीचा दर्जा








आणखीच खालावत चालला आहे . . . यामुळे कामगारवर्गाला दिवसेदिवस निकृष्ट अन्न खावे लागत आहे. ''

## अतिशयोक्तीला अनुभवाची मुरड

वरील वर्णन मार्क्स-लेनिन वादातील प्रमेयांशी सुसंगत असले तरी ते वस्तुस्थितीवर आधारलेले नव्हते. कारण वस्तुस्थिती नेमकी त्याच्या विरुद्ध होती व व पश्चिम युरोपात सर्वत्र आर्थिक भरभराट आढळत होती. परिणामी १९५८ साली या ग्रंथाची नवीन आवृत्ति प्रसिद्ध करण्यात आली; त्यात वरील उफराट्या अतिशयोक्तीला मुरड घालण्यात आली. काही ठिकाणी प्रचलित परिस्थितीच्या विवेचनातही बदल करण्यात आला. भांडवलशाही राष्ट्रांमध्ये युद्धे पेटणे अपरिहार्य आहे, या लेनिनच्या सिद्धान्ताला या नव्या आवृत्तीत चाट देण्यात आली. त्याचप्रमाणे पश्चिम युरोपांतील कामगार वर्गाच्या काल्पनिक दैन्यावस्थेच्या वर्णनातील हास्यास्पद अतिशयोक्ती कमी करण्यात आली व त्याऐवजी 'पश्चिम युरोपातल्या औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रांतील कामगारांपैकी एका वर्गाने वाढत्या पिळणुकीचा प्रतिकार करून आपले जीवनमान सुधारण्यात यश मिळवले आहे' असा अप्रत्यक्ष व अपुरा कबुलीजबाब देण्यात आला. अर्थात भांडवलशाहीत कामगार वर्ग दिवसेदिवस अधिकाधिक गरीब बनत जातो या मार्क्सवादी सिद्धान्ताचा या नव्या आवृत्तीतही पुनरुच्चार करण्यात आला होता.

## सामायिक बाजारपेठेचे दोन अन्वयार्थ

त्याचप्रमाणे, युरोपीय सामायिक बाजारपेठेच्या स्थापनेचा अन्वयार्थही या ग्रंथात मार्क्सवादी सिद्धान्तानुसार खालीलप्रमाणे लावण्यात आला होता.

'' पश्चिम युरोपातील भांडवलशाही राष्ट्रांचा आर्थिक, राजकीय व इतर क्षेत्रात एकसंध गट निर्माण करण्याच्या निरनिराळ्या योजनांमुळे या गटातल्या घटक राष्ट्रांमधील प्रचलित संघर्ष व वैमनस्ये नाहीशी होण्याऐवजी ती वाढीसच लागली आहेत. ''

हा ग्रंथ प्रसिद्ध होऊन आता चार वर्षे लोटली आहेत, व पश्चिम युरोपातील राष्ट्रांमधील वाढत्या संघर्षाचे दुसऱ्या आवृत्तीत रंगवलेले चित्र पहिल्या आवृत्तीतील मार्शल योजनेच्या परिणामाच्या वर्णनाप्रमाणेच निराधार ठरले आहे. पश्चिम युरोपातील घडामोडींचे आकलन करण्यात आलेल्या या अपयशामुळेच ऑगस्टच्या अखेरच्या आठवड्यात मॉस्कोमध्ये जगातील प्रसिद्ध कम्युनिस्ट अर्थशास्त्रज्ञांची परिषद भरविण्यात आली व तिच्यात युरोपीय सामायिक बाजारपेठेच्या स्थापनेमुळे पश्चिम युरोपात जी सर्वत्र आर्थिक भरभराट आढळत आहे तिचा विचार करण्यात आला. या परिषदेत सामायिक बाजारपेठेबद्दलच्या मार्क्सवादी ठोगळेबाज विश्लेषणावर अनेकांनी टीका केली, इतकेच नव्हे, तर ही बाजारपेठ म्हणजे '' पश्चिम युरोपातील मक्तेदार भांडवलशहांची तेथील कामगारांविरुद्ध उघडण्यात आलेली संयुक्त आघाडी आहे '' या कम्युनिस्टांच्या अधिकृत भूमिकेवर टीका करणारा व या '' बाजारपेठेमुळे पश्चिम युरोपातील कामगारवर्गाचाही फायदा झाला आहे '' हा मुद्दा मांडणारा प्रबंध इटालिअन कम्युनिस्ट पक्षातर्फे या परिषदेला सादर करण्यात आला! सामायिक बाजारपेठेचा वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून विचार करण्यात यावा असाही आग्रह या प्रबंधात धरण्यात आला होता. पण अखेरीस युरोपीय सामायिक बाजारपेठेच्या प्रश्नावर या कम्युनिस्ट अर्थशास्त्रज्ञात एकमत होऊ शकले नाही. खुद्द रशियन कम्युनिस्ट पक्षाला व राज्यकर्त्यांना या प्रश्नावर अजून निश्चित अशी भूमिका स्वीकारणे शक्य झालेले नाही, हे रशियन वृत्तपत्रात त्याबाबत प्रसिद्ध होणाऱ्या परस्परविरोधी विधानांनी सिद्ध झाले आहे. या अर्थशास्त्रज्ञांच्या परिषदेच्या वेळी रशियन कम्युनिस्ट पक्षातर्फे—मास्कोतील '' इन्स्टिट्यूट ऑफ वर्ल्ड इकॉनॉमी '' या संस्थेतर्फे—युरोपीय सामायिक बाजारपेठेवर काही लेख प्रसिद्ध करण्यात आले होते. त्या लेखांमध्ये १९५८ साली कम्युनिस्टांनी घेतलेल्या भूमिकेत थोडासा बदल करण्यात आला आहे. या सामायिक बाजारपेठेमुळे भांडवलशाही राष्ट्रांतील अंतर्गत संघर्ष वाढीस लागतील हे पूर्वीचे विधान वगळून त्याऐवजी ही बाजारपेठ म्हणजे '' आंतरराष्ट्रीय साम्राज्यवादी वर्गाच्या एकजुटीचे हत्यार आहे '' अशी भूमिका घेण्यात आली आहे.

ही जुजबी दुरुस्ती सोडली तर अजूनही भांडवलशाही समाजव्यवस्थेतील वाढत्या अंतर्गत वर्गकल-








ह्याच्या जुनाट सिद्धान्ताला कम्युनिस्ट राज्यकर्ते पूर्वीप्रमाणेच चिकटून राहिले आहेत. सामायिक बाजारपेठेमुळे पश्चिम युरोपातील आर्थिक व राजकीय संघर्ष कमी होईल व त्यामुळे प० युरोपीय राष्ट्रांची निरोगी एकजूट होऊ शकेल हे मान्य करण्यास अजूनही त्यांची तयारी नाही. उलट अजूनही प० युरोपीय राष्ट्रांमधील आर्थिक व राजकीय कलह दिवसेदिवस अधिकाधिक तीव्र होत जातील ही फोल आशा ते उराशी बाळगून आहेत.

## शब्दप्रामाण्याचा अट्टाहास

अशारीतीने गेल्या दहा वर्षांत दोन अत्यंत महत्त्वाच्या ऐतिहासिक घडामोडींचे आकलन करून घेण्यास कम्युनिस्ट विचारवंत असमर्थ ठरले व दोनही वेळी त्यांनी वस्तुस्थितीचा बिनतोड पुरावा मान्य करण्याचे नाकारून आपल्या जनाट सिद्धान्तांना कवटाळून धरण्याचे शब्दप्रामाण्यवादी धोरण स्वीकारले. १९५५ साली माशल मदत योजनेमुळे पश्चिम युरोपातील राष्ट्रे अधिकाधिक दरिद्री बनतील हे बिनबुडाचे भाकित कम्युनिस्ट अर्थशास्त्रज्ञांनी कल याचे कारण भांडवलशाही समाजव्यवस्थेत कामगारवर्ग दिवसेदिवस अधिकाधिक गरीब बनत जातो हा मार्क्सचा सिद्धान्त बदलल्या परिस्थितीत नव्याने पारखून घेण्यास त्यांनी नकार दिला! त्याचप्रमाणे १९५८ साली युरोपीय सामायिक बाजारपेठेची स्थापना होत असताना पश्चिम युरोपीय राष्ट्रांची होत असलेली आर्थिक व राजकीय एकजूट सांप्रदायिक अभिनिवेशाने दृष्टिआड करून कम्युनिस्टांनी पश्चिम युरोपातील राष्ट्रांमध्ये अंतर्गत संघर्ष वाढीस लागत असल्याचे चित्रण केल, याच कारण भांडवलशाही राष्ट्रांमध्ये परस्परसंघर्ष व कलह वाढीस लागणे अपरिहार्य आहे, या लेनिनच्या सिद्धान्ताला त्यांनी त्रिकालबाधित सत्याचे स्वरूप दिले.

मार्क्स व लेनिन यांचे हे सिद्धान्त अजूनही कम्युनिस्ट तत्त्वज्ञ उराशी बाळगून आहेत आणि त्यामुळे प्रचलित परिस्थितीचे त्यांना योग्य आकलन न होण्याची शक्यता अजूनही पूर्वीइतकीच आहे. या दोनही सिद्धान्तांचे खंडन सुप्रसिद्ध जर्मन समाजवादी विचारवंत एडवर्ड बर्नस्टीन याने साठ वर्षांपूर्वी आपल्या ग्रंथात केले होते, व त्यामुळे त्याच्यावर 'सुधारणावादा'चा आरोप करून त्यावेळी लेनिनने त्याला बहिष्कृत ठरवले होते! त्यामुळे आजही कोणत्याही कम्युनिस्ट विचारवंताला पश्चिम युरोपातील आर्थिक प्रगतीची कबुली देणे शक्य होत नाही. कारण असे करणे म्हणजे या दोन सिद्धान्ताचेच खंडन करणे व बर्नस्टीन प्रमाणेच "सुधारणावादी" बनण्याचा अपराध करणे आहे! आणि कम्युनिस्टांच्या कळपात असा अपराध करणे म्हणजे राजकीय आत्महत्याच करणे होय!!

सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाचे सरचिटणीस व रशियन हुकुमशहा क्रुश्चेव्ह हे त्यांच्या वास्तववादी व व्यवहारी दृष्टिकोनाबद्दल प्रसिद्ध आहेत; पण खुद्द क्रुश्चेव्ही स्वतः पश्चिम युरोपमधील आश्चर्यकारक आर्थिक प्रगतीमुळे कम्युनिस्ट अथशास्त्रज्ञांप्रमाणेच बुचकळ्यात पडले आहेत. कारण पश्चिम युरोपातील वस्तुस्थितीचे पूर्वग्रहविरहित दृष्टीने सांगोपांग विवेचन करणारी व तदनुसार अधिकृत साम्यवादी सिद्धान्तांमध्ये आवश्यक असे फेरफार सुचवू शकणारी एकही अधिकारी व्यक्ती आज कम्युनिस्टांजवळ नाही! आणि त्याचमुळे युरोपीय सामायिक बाजारपेठेचा अन्वयार्थ योग्यरीतीने कसा लावावा हा बिकट व मूलगामी प्रश्न आज कम्युनिस्टांपुढे उभा आहे!

— अर्नेस्ट हाल्पेरिन यांच्या Die Tat या स्विस् दैनीकातील लखाचा अनुवाद.










# लांबी मोजण्यासाठी
# फक्त
# मेट्रिक परिमाणेंच वापरा

लांबी मोजण्यासाठी १ ऑक्टोबर–१९६२ पासून सबंध देशात मेट्रिक परिमाणांचा उपयोग सक्तीचा झाल्यामुळे सर्व व्यवहार मीटरमध्येच करावयाचे असतात.

काही कपडे शिवण्यासाठी लागणाऱ्या कापडाची लांबी खाली मीटरमध्ये दर्शविली आहे. नव्या मेट्रिक परिमाणाच्या वाढत्या परिचयाने कापडाच्या लांबीचा विचार वारात करण्याचे तुम्ही लवकरच सोडून द्याल.





| | | | |
|---|---|---|---|
| शर्ट | : | २मीटर व ७५ सेंटिमीटर (म्हणजे २॥। मीटर) ३ वारांबद्दल | |
| कोट | : | २·७५ मीटर | प्रत्येकी (३ वारांबद्दल) |
| ट्राउझर्स | : | २·७५ मीटर | |
| ब्लाऊझ | : | ०·९० मीटर | (१ वाराबद्दल) |

६ वारी साडीची लांबी ५॥ मीटर असेल.

१ मीटर = १ वार (गज) अधिक ३॥ इंच.
१ वार कापडाची किंमत १ रु. असल्यास १ मीटर त्याच कापडाची किंमत एक रु. व नऊ न. पै. असेल.

**मेट्रिक पद्धति म्हणजे सुलभता व एकसूत्रता**

भारत सरकार द्वारा प्रकाशित

DA-62/432

श्री. रा. व. आठवले

# जगन्नाथ-पंडित व रचनाकार

प्राचीन भारतातील संस्कृत कवींच्या रमणीय साहित्यकृतींचा आस्वाद घेणाऱ्या काव्यरसिकांच्या मनाला सतत त्रोचणारे शल्य हे आहे की ह्या सर्व काव्यकृतींच्या निर्मात्यांविषयी – त्यांच्या जीवनचरित्राविषयी फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. आणि ही थोडीफार माहितीसुद्धा फारच थोडया भाग्यशाली कवींच्या बाबतीत मिळते; आणि जी माहिती मिळते ती सुद्धा, अत्यंत त्रोटक. कवीचा समय, त्याचे वसतिस्थान, त्याचे कुटुंब, त्याचा आश्रयदाता, एवढ्यापुरती माहितीसुद्धा ज्यांच्याविषयी मिळत नाही असे कवीच फार. अशा या कवींपैकी, जगन्नाथ 'पंडित व कवि' ही तर अर्वाचीन भारतातील, म्हणजे मोगल बादशहाच्या दरबारात कविराज म्हणून प्रसिद्ध असणारी एक व्यक्ति ना; पण आज त्याच्याविषयी अत्यंत विश्वसनीय अशी फारच थोडी माहिती आपल्याला मिळते, हे केवढे आश्चर्य ? तो मोगल बादशहांपैकी शहाजहानाच्या पदरी होता; बादशहाने त्याला पंडितराज ही पदवी दिली होती; या 'दिल्लीवल्लभाच्या पाणिपल्लवाच्या तली ( खाली ) राहून त्याने आपले तरुण वय व्यतीत केले; तो एक तैलंग ब्राह्मण असून त्याच्या पित्याचे नाव पेरुभट्ट व मातेचे नाव लक्ष्मी होते;–एवढीच त्याच्याविषयीची संदेहरहित अशी माहिती इतिहाससंशोधक आम्हाला देतात. पण, तो केव्हा व कुठे जन्मला, दिल्लीश्वराचे पदरी राहायला तो केव्हा आला, त्याच्या पूर्वी तो कुठे होता, दिल्लीत तो आपल्या शेवटच्या दिवसातही होता, का दुसरीकडे कुठे गेला होता, त्याचा निधनकाल कोणता, इत्यादि, त्याच्या जीवनातील महत्त्वाच्या गोष्टींविषयी निश्चित असे काहीही आज आम्हाला संशोधक सांगू शकत नाहीत. इतकेच नव्हे तर 'शहाजहानाच्या दरबारात एकाच वेळी दोन जगन्नाथ विद्यमान होते– एक जगन्नाथ पंडित व कवि; आणि दुसरा जगन्नाथ गवई ( कलाकार ) व संगीतरचनाकार–' असेही काही इतिहास संशोधक आता आम्हाला सांगू लागले आहेत.

अशा या संशोधकांपैकी एक ख्यातनाम इतिहासज्ञ, श्री. सेतुमाधवराव पगडी, यांनी 'नवभारत' मासिकाच्या डिसेंबर १९६१ च्या अंकात 'जगन्नाथ पंडित व जगन्नाथ कलाकार' या शीर्षकाखाली एक लेख लिहिला आहे. त्यात आपल्या विधानाच्या समर्थनार्थ तत्कालीन अनेक फारशी लेखांतून उतारे देऊन व इतर काही लेखकांचा आधार देऊन असे निश्चित अनुमान त्यांनी केले आहे की, पंडित व कवि जगन्नाथ ही व्यक्ति निराळी व कलाकार व रचनाकार (Composer) जगन्नाथ ही व्यक्ति निराळी; हे दोघेही जगन्नाथ एकाच वेळी शहाजहानच्या पदरी होते; या दोन जगन्नाथांपैकी कलाकार व रचनाकार जगन्नाथाला शहाजहानने 'कविराज' ही पदवी देऊन त्याची रौप्यतुला करविली; आणि पंडित व कवि जगन्नाथाला 'पंडितराज' ही पदवी दिली.'

## प्रणयप्रसंगाचा प्रवाद

याशिवाय श्री. पगडी यांनी याच लेखात जगन्नाथाविषयीच्या दुसऱ्याही एका महत्त्वाच्या मुद्याची चर्चा केली आहे; तो मुद्दा म्हणजे जगन्नाथ पंडिताचा लवंगी या यवनी तरुणीशी असलेल्या प्रणयसंबंधाविषयीचा. ह्या मुद्याची त्यांनी बरीच चर्चा केली आहे, व शेवटी असे स्वतःचे मत दिले आहे की "पंडितराज जगन्नाथावर यवनीसंसर्गाचा दोष लादून मोठा अन्याय करण्यात आला आहे; यवनीशी संबंध आला असेलच तर तो पण्डितराज जगन्नाथाचा नव्हे तर तानसेनचा शिष्य आणि शहाजहानच्या राज्यारोहणप्रसंगी ( १६२७ ) साठीच्या घरात असलेला सुप्रसिद्ध संगीतज्ञ जगन्नाथ कलावंत याचा होय."

अगोदरच पंडित जगन्नाथाच्या चरित्राविषयीची संशोधकांना आजपर्यंत मिळालेली निश्चित माहिती अगदीच तुटपुंजी; आणि त्यात पुन्हा श्री. पगडी यांच्या सारख्या इतिहासज्ञ पंडितानी प्रस्तुत लेखात केलेली जगन्नाथाविषयीच्या प्रचलित समजुतींना धक्का



अनुक्रमणिका

देणारी ही विधाने; त्यामुळे जगन्नाथाच्या चरित्राविषयी जिज्ञासू असणारांच्या मनाचा गोंधळ उडणे अगदी स्वाभाविक आहे. आणि म्हणूनच श्री. पगडी यांनी आपल्या लेखात आपल्या मताच्या समर्थनार्थ दिलेल्या पुराव्यांची छाननी करणे, त्यांनी स्वविरोधी मतांचे खंडन करताना अवलंबिलेल्या युक्तींचे प्रामाण्य तपासणे व अशारीतीने त्यांच्या मतांचे मूल्यमापन करणे, सत्यान्वेषणाच्या दृष्टीने आवश्यक आहे. माझ्या प्रस्तुत लेखात मी हे कटु पण आवश्यक कार्य करणार आहे.

## पगडींचा डळमळीत पुरावा

'दोन जगन्नाथ एकाच वेळी शहाजहानच्या पदरी होते, या स्वतःच्या क्रांतिकारी विधानावर भाष्य करताना श्री. पगडी आम्हाला सांगतात की, "ह्या दोन जगन्नाथापैकी पहिला जगन्नाथ हा केवळ पंडित व कवि होता; आणि दुसरा जगन्नाथ हा केवळ कलाकार ( म्ह० गवई ) व ( संगीत ) रचनाकार होता; आणि हा दुसरा कलाकार जगन्नाथ म्हणजे–बिकानेरच्या ( राजा ) अनूपसिंगाच्या पदरी असलेल्या संगीतज्ञ भावभट्टाचा बाप." आपल्या ह्या विधानाला आधार म्हणून श्री. पगडी यांनी "इस्लामिक कल्चर जानेवारी १९५५, धर्मभानू यांचा लेख–' भारतातील तुर्क अफगाण राजवटीतील संगीताची उन्नति ' –" याचा निर्देश केला आहे.

श्री. पगडी यांचे वरील विधान सपशेल चुकीच्या माहितीवर आधारलेले आहे. कसे ते पहा–

भावभट्ट या संगीतज्ञाने संगीतावर संस्कृत भाषेत अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी, ' अनूपसंगीतविलास ' या ग्रंथाच्या स्वात्मभावप्रकाश नावाच्या षष्ठ प्रकाशात तो लिहितो :—

' कृष्णाजगोत्रसंभूतं कुलमाभीरदेशजम् ।
पुरं धवलमित्याहुः प्रपिता तानभट्टकः ॥
पिता जनार्दनः, साक्षाज्जनार्दन इवापरः ।
मातुः स्वप्नभवा नाम......
तेनेदं भावभट्टेति कीर्तितं शास्त्रसंभवम् ।
तौर्यत्रिकं तु संगीतं संगीती तज्ज्ञ उच्यते ॥ '

भावभट्टाने स्वतःविषयी दिलेल्या या माहितीप्रमाणे तो ग्वालेरजवळच्या धवलपूरचा राहाणारा असून त्याच्या वडिलांचे नाव जनार्दन व आईचे स्वप्नभवा. जनार्दन हा संगीतशास्त्रज्ञ व उत्तम गायक होता. त्याने आपला मुलगा भावभट्ट याला संगीताचे शिक्षण स्वतः दिले होते असे भावभट्टाच्या

' निबंधोऽसौ कृतो मया ।
गुरुपितृप्रसादेन लब्धया ज्ञानसंपदा ।

या निर्देशावरून दिसते. "जनार्दन हा दिल्लीपति शहाजहान याचे पदरी असून त्यास ' सभामण्डलमंडनसंगीतराज ' ही पदवी होती," असे अनूपसंगीतविलास इ. ग्रथांचे संपादक पं. दत्तात्रेय केशव जोशी हे त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत लिहितात. यावरून जनार्दन हा उत्तम कलाकार ( गवई ) होता हे उघड आहे.

वरील भावभट्टाच्या ग्रंथात आलेल्या उल्लेखावरून त्याच्या बापाचे नाव जनार्दनच, जगन्नाथ नव्हे, हे स्पष्ट होते. अर्थातच भावभट्टाच्या बापाचे नाव जगन्नाथ, असे लिहिण्यात धर्मभानूंची, व त्यांच्यावर आधार ठेवण्यात श्री. पगडींची, मोठीच चूक झाली असे म्हणणे भाग आहे. याप्रमाणे जनादनालाच जगन्नाथ असे ठरविण्याची चूक मुस्लीम लेखकांनी केली असे सिद्ध झाल्याने, आता पंडित जगन्नाथ हा एकच उरला, व तोच मुस्लीमांचा रचनाकार होय असे मानलेच पाहिजे.

## रचनाकार म्हणजे कलाकार नव्हे

पण श्री. पगडींचा ' दोन जगन्नाथ ' या त्यांच्या विधानाचे बाबतीत खरा आधार म्हणजे त्यांनी आपल्या लेखात मुस्लीम लेखकांच्या ग्रंथातून उद्धृत केलेले उतारे. पण या उताऱ्यांनी श्री. पगडी यांचा मोठाच विश्वासघात केला आहे. कारण की, या उताऱ्यात ( त्यांचा दुसरा ) जगन्नाथ हा उत्तम गवई होता व त्याने आपल्या मधुर गायनाने बादशहाला मोहित करून टाकले होते, असे कुठेही म्हटलेले नाही. उलट यांपैकी एका उताऱ्यात ' या भाग्यशाली युगात पदे रचणारात मुसन्निफान म्हणजे लेखक, रचनाकार ( Composer ) जगन्नाथ महाकविराय हा श्रेष्ठ होय, ' असे स्पष्ट शब्दात सांगितले आहे. मग या उताऱ्याच्या आधारावर ' यात उल्लेखिलेला जगन्नाथ, कलाकार ( म्ह० गवई ) व रचनाकार होता, तो पंडित व कवि नव्हता, अर्थात् तो दुसराच कोणी जगन्नाथ होता, ' असे विधान श्री. पगडी का करतात ? मला वाटते की, श्री. पगडींच्या या








विचित्र विधानाबद्दल संगीताविषयीच्या त्यांच्या चुकीच्या समजुतीला जबाबदार धरले पाहिजे. संगीतपद्यांचा रचनाकार म्हणजेच कलाकार म्हणजेच गवई हे त्यांचे समीकरण अगदी चुकीचे आहे. एखादा माणूस गाण्यात अत्यंत निपुण असला की तो संगीताकरिता पदे रचण्यातही निपुण असलाच पाहिजे असे मुळीच नाही. याचे उलट पद्यरचनेत प्रवीण असलेला माणूस पट्टीचा गाणारा असतोच असे नाही. आणि गाण्यात व पद्यरचनेत निष्णात असलेली एखादी व्यक्ती संगीतशास्त्रज्ञ असलीच पाहिजे असेही नाही. सगाताच्या क्षेत्रातील गायन, पद्यरचना व संगीतशास्त्रज्ञता हे तीन गुण परस्पर विरोधी नसले तरी हे तीनही गुण एकाच व्यक्तीचे ठिकाणी फार क्वचित आढळतात. पण ज्या महाभागाच्या ठिकाणी हे तीनही गुण उत्कटत्वाने वास करतात त्याला संगीताच्या क्षेत्रात फार मोठा मान दिला जातो, व 'वाग्गेयकार' म्हणून त्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला जातो. आमचा पंडित व कवी जगन्नाथ हा असा वाग्गेयकार असेल असे दिसत नाही; कारण संगीतशास्त्रावर त्याने एखादा ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख अजून संशोधकांना आढळला नाही; तथापि संगीतपद्यरचनाकार म्हणून दिल्लीदरबारात त्याची ख्याति होती असे म्हणण्यास हरकत नसावी.

## किमंकुशे विवादः

या शिवाय श्री. पगडी यांनी दिलेल्या पहिल्या उताऱ्यातील 'जगन्नाथाच्या मधुर रचना कर्नाटकी भाषेत असत. इकडील लोकांना ती भाषा समजत नसल्याने ते फक्त (त्याच्या) पदांचे राग आणि सर यांचाच आस्वाद घेऊ शकत' ही वाक्ये तर त्यांच्या विधानाला पूर्णपणे बाधक आहेत. कारण त्यांच्या (दुसऱ्या) कलाकार जगन्नाथाचा उल्लेख या उताऱ्यात आला आहे असे जर (श्री. पगडी यांच्या मताला मान देऊन) मानले तर, "हा दुसरा कलाकार जगन्नाथ कर्नाटकी संगीतात निष्णात होता, तो आपल्या मधुर (पद्य) रचना कर्नाटकी भाषेत करीत असे; ती त्याची कर्नाटकी पदे दिल्लीतील लोकांना समजत नसल्याने, ते त्या पदांच्या रागदारीवर (मधुर) स्वरावर व जगन्नाथाच्या मधुर व सुरेल आवाजावर मुग्ध होत असत," असेही मान्य करावे लागेल! आणि श्री. पगडी यांच्या दुसऱ्या उताऱ्यातील काही वाक्ये आधाराला घेऊन ह्या कर्नाटकी कलाकार जगन्नाथाविषयी असेही म्हणता येईल की, "ह्या कर्नाटकी कलाकार जगन्नाथाला बादशहाने कविराय ही पदवी दिली होती; हिंदुस्तानी पदे रचण्यात हिंदुस्तानात तो त्यावेळी अद्वितीय होता. पदे (म्हणजेच संगीतात गाता येतील अशा कविता) रचण्याच्या कामासाठीच त्याला राजधानीत ठेवण्यात आले होते; त्याने बादशहाच्या स्तुतिपर बारा पदे (त्यांपैकी काही सस्कृत कविता होत्या असे सांगून दंतकथेने त्यापैकी पाच कविता जतन करून ठेवल्या आहेत) रचिली. ती फार मनोहर होती; ती पदे निरनिराळ्या रागात (निरनिराळ्या वृत्तात व चालीत) होती. ती बादशहाला फार आवडली. त्याच्या आज्ञेने जगन्नाथ कलाकार कविराय याची तुला करण्यात आली." श्री. पगडी यांनी दिलेल्या उताऱ्यावरून त्यांच्या (दुसऱ्या) कलावंत कर्नाटकी जगन्नाथाविषयी जर इतके व असे म्हणता येते, आणि हे वर्णन जर आमच्या पंडित व कवि जगन्नाथालाही तंतोतंत लागू पडत असेल तर, कलाकार जगन्नाथ व पंडित जगन्नाथ ही एकच व्यक्ती होती, असे म्हणण्याला श्री. पगडी यांनी का कचरावे? 'विक्रीते करिणी किमंकुशे विवादः?'

## पगडींचे उलटणारे पुरावे

श्री. पगडी यांनी आपल्या लेखात दिलेले उतारे विश्वासघातकी आहेत असे जे मी वर म्हटले होते त्याचे मर्म आता वाचकांच्या ध्यानात येईल. जगन्नाथ दोन होते असे सिद्ध करण्याकरिता श्री. पगडी यांनी आपल्या लेखात जे जे पुरावे दिले आहेत ते ते सर्व त्यांना सर्वस्वी प्रतिकूल आहेत, व 'कलाकार कवी व पंडित जगन्नाथ ही एकच व्यक्ति' ह्या प्रचलित मान्यतेला अनुकूल आहेत. त्यांनी दिलेल्या या पुराव्याबद्दल त्यांचे प्रतिपक्षी त्यांचे आभारच मानतील.

## दाक्षिणात्य भाषांचा गोंधळ

त्यांनी दिलेल्या उताऱ्यांतील एक दोन उल्लेखांची चर्चा ह्या ठिकाणी करणे अगत्याचे आहे. यांपैकी एका उताऱ्यात 'जगन्नाथ कर्नाटकी भाषेत पद्ये रचून ती गात असे,' असा उल्लेख आहे; आणि पंडितराज हा तर आंध्र प्रांतात जन्मलेला तेलंग ब्राह्मण होता.





अनुक्रमणिका

अर्थात् त्याची मातृभाषा तेलगूच असली पाहिजे. मग त्याने कर्नाटकी भाषेत पद्यरचना केली हे कसे ? या शंकेला दोन निरनिराळी उत्तरे देता येतील. पहिले उत्तर हे की त्यावेळच्या उत्तरेकडील लोकांना कानडी व तेलगू यातील सूक्ष्म फरक कळत नसावा; ते दक्षिण भारतातील कानडी, तेलगु, तामीळ व मल्याळी या चारी भाषांना कानडी या एकाच नावाने ओळखत असावे; आणि जगन्नाथाची तेलगु भाषेतील पद्ये त्यांना कानडी वाटली असावी. पण त्यावेळेच्याच लोकांना ती पदे कानडी वाटली असे तरी का म्हणावे ? आज आमच्यापुढे दक्षिण भारतातील एखादा गवई तामीळ भाषेतील पद गाऊ लागला तर आम्हाला सुद्धा ते कानडी पदच आहे असे वाटेल. पं. विष्णु दिगंबराच्या संप्रदायात गायले जाणारे 'नीन्दु चरणमुळे०' हे पद तेलगु भाषेतले का कानडीतले हे मी निश्चितपणे आजही सांगू शकणार नाही.

## रूढीतील कर्नाटकी संगीत

दुसरे उत्तर असे की दक्षिणभारतात प्रचलित असलेल्या संगीतपद्धतीला कर्नाटकी संगीत हे नाव शेकडो वर्षांपासून रूढ आहे. त्या संगीतातील रागांचे सुद्धा कर्नाटकी राग हेच रूढ नाव आज आहे, व तीनशे वर्षांपूर्वीही तेच होते. त्यात अंतर्गत भेद असेल, व त्याची प्रांतीय नावेही निराळी असतील; पण दूरच्या उत्तर हिंदुस्थानातील लोकांना कानडी संगीत व कानडी भाषेतील रचना ही एकच गोष्ट माहीत होती; त्यामुळे त्यांनी जगन्नाथाच्या संगीताला 'कानडी भाषेतील संगीत' म्हटले असावे.

## जगन्नाथाचे हिंदीभाषाप्रभुत्व

दुसरी शंका पंडित जगन्नाथाच्या हिंदुस्तानी भाषेतील पद्यरचनेसंबंधी. पंडित जगन्नाथाला हिंदुस्तानीत पद्यरचना करण्याइतके त्या भाषेचे ज्ञान होते का ? ह्या शंकेचे निःसंदिग्ध उत्तर हे की पंडित जगन्नाथाला हिंदी ( याने हिंदुस्तानी ) भाषा उत्तम तऱ्हेने अवगत होती. ह्या विधानाला पोषक असे दोन पुरावे जयपूरचे प्रसिद्ध संस्कृत पंडित मथुरानाथशास्त्री यांनी दिले आहेत. त्यांपैकीं एक पुरावा हा की जगन्नाथ पंडिताच्या एका शिष्याने साहित्यशास्त्रावर हिंदीत एक ग्रंथ लिहिला आहे, त्यात त्याने अनेकभाषाकोविद म्हणून जगन्नाथाची प्रशंसा केली आहे. दुसरा पुरावा हा की हिंदी भाषेतील प्रसिद्ध कवी बिहारीलाल यांच्या सतसई या हिंदी मुक्तकाव्यसंग्रहातील अनेक काव्ये जगन्नाथाने संस्कृत भाषेत अनुवादिली आहेत. त्यावरून त्याच्या हिंदी भाषेवरील प्रभुत्वाचे अनुमान करता येते.

आतापर्यंत केलेल्या चर्चेचा निष्कर्ष हा की, दिल्ली दरबारात शहाजहानच्या पदरी कलावंत जगन्नाथ व पंडित जगन्नाथ असे दोन जगन्नाथ नसून पंडित, कवी, कलाकार व रचनाकार असणारा जगन्नाथ ही एकच व्यक्ति होती.

## लवंगीप्रणयकथा

आता श्री. पगडींनी आपल्या लेखात चर्चेकरता घेतलेल्या दुसऱ्या मुद्द्याकडे वळतो. हा विवाद्य मुद्दा म्हणजे जगन्नाथ-लवंगी-प्रणयाविषयीचा. ह्या मुद्द्याविषयी दोन पक्ष निर्माण झाले आहेत. एका पक्षाचे म्हणणे असे की, पंडित जगन्नाथ हा दिल्लीश्वरांच्या छत्रच्छायेखाली दिल्लीत राहात असता त्याचा लवंगी नावाच्या एका यवनी तरुणीशी प्रणयसंबंध जडला होता. ह्या प्रणयसंबंधाचा तत्कालीन ब्राह्मणवृन्दात फार गवगवा झाला व त्यांनी सभा भरवून जगन्नाथाला ज्ञातिबहिष्कृत केले;यामुळे पस्तावलेल्या जगन्नाथाने यवनीसंसर्गदोषातून आपणाला मुक्त करावे, व आपल्यावर करुणा करावी म्हणून गंगामाईचे स्तोत्र रचिले; आज प्रसिद्ध असलेली 'गंगालहरी' हे ते स्तोत्र. दुसरा पक्ष असे म्हणतो की, जगन्नाथाचा लवंगीशी प्रणयसंबंध होता ही खोटी गोष्ट; याला दंतकथेशिवाय दुसरा कसलाच पुरावा नाही. पहिल्या पक्षाचे महाराष्ट्रातील प्रतिनिधि प्रा. गोडे, व दुसऱ्या पक्षाचे वकील श्री. पगडी हे आहेत.

प्रा. गोडे यांनी जगन्नाथाच्या प्रणयसंबंधाचा अस्तिपक्षी पुरावा म्हणून इ. स. १७८८ चे सुमारास सदाशिव नांवाच्या पंडिताने जगन्नाथाच्या गंगालहरीवर लिहिलेल्या संस्कृत टीकेतून खालील उतारा दिला आहेः-

"अथ एवं श्रूयते। कविजगन्नाथो दिल्लीवल्लभाश्रितस्तद्यवनीसंसर्गदोषभाक् सन्, गंगासकाशात् आत्मशुद्धिं कामयमानः सन्, गंगास्तुतिरूपं काव्यं चिकीर्षुः, स्वाभिमतं प्रार्थयते 'समृद्धं ( सौभाग्यं ) इति।"



अनुक्रमणिका






हा उतारा देऊन व त्याच्या प्रामाण्याविषयी थोडी चर्चा करून, समारोपात, प्रा. गोडे[1] लिहितातः-

" At any rate, we should keep it open for further investigation, and should not treat it as pure myth without any foundation in fact. "

प्रा. गोडे यांनी जगन्नाथलवंगीसंबंधाचे बाबतीत दिलेल्या या पुराव्यावर आक्षेप घेऊन शेवटी श्री. पगडी लिहितात :— " माझ्या मते पंडितराज जगन्नाथावर यवनीसंसर्गाचा दोष लादून मोठा अन्याय करण्यात आला आहे. "

हा अन्याय कसा ? तर " पंडितराज जगन्नाथासारखा धार्मिक मनोवृत्तीचा सच्छील ब्राह्मण एका यवनी तरुणीच्या प्रेमपाशात पडेल तरी कसा ? ही गोष्ट अशक्य आहे ! तेव्हा त्याच्यावर असा आरोप करणे हा मोठाच अन्याय आहे. आता जगन्नाथ-लवंगी-प्रणयसंबंधाची ही दंतकथा खरी आहे असे कुणी सिद्ध केले तर त्यावर श्री. पगडींचे उत्तर तयारच आहे. ते लिहितात :—" ( जगन्नाथाचा ) यवनीशी संबंध आलाच असेल तर, तो पंडित जगन्नाथाचा नव्हे, तर तानसेनचा शिष्य आणि शहाजहानच्या राज्यारोहणप्रसंगी ( १६२७ ) साठीच्या घरात असलला सुप्रसिद्ध संगीतज्ञ जगन्नाथ कलावंत याचा होय." श्री. पगडी यांच्या या एका वाक्यात अनेक तर्कदुष्ट अतएव भोंगळ विधाने खच्चून भरलेली आहेत, असे मोठ्या कष्टाने म्हणावे लागते. प्रथम म्हणजे पंडितराज जगन्नाथ व कलाकार ( रचनाकार ) जगन्नाथ हे दोन निराळे होते असे मानले तरी कलाकार जगन्नाथ हा तानसेनचा शिष्य होता हे कशावरून ? तो तानसेनाचा ' शागिर्द ' होता असे मानण्यास काही आधार आहे का ? श्री. पगडी यांनी आपल्या लेखात जगन्नाथ व तानसेन यांच्या विषयीची एक आख्यायिका ( श्री. ए. हलीम यांच्या लेखातून उद्धृत करून ) दिली आहे. तिचा सारांश असा - पद्यरचनाकार जगन्नाथाने काही ध्रुपदे रचून ती मिया तानसेनसमोर ठेवली, त्यावर तानसेनने त्याचा गौरव करून म्हटले की, ' याला आयुष्य लाभले तर, रचनेमध्ये याचा दर्जा फक्त माझ्या खालोखाल राहील. '

## पंडित आणि प्रणय

येवढ्या आधारावर कलाकार जगन्नाथ हा तानसेनाचा शिष्य होता असे म्हणता येईल का ? शिवाय, हा कलाकार जगन्नाथ, शहाजहानच्या राज्यारोहणप्रसंगी ( १६२७ मध्ये ) साठीच्या घरात आला होता याला प्रमाण काय ? श्री. पगडी यांनी या कलाकार जगन्नाथाचा जन्म या तानसेनच्या आख्यायिकेच्या आधारावर, इ. स १५७० च्या सुमारास झाला असावा, असा अंदाज केला आहे. पण ही तानसेनची आख्यायिका पंडित जगन्नाथाच्या बाबतीत खरी मानायला तरी काय हरकत ? बरे, श्री. पगडी यांनी म्हटल्याप्रमाणे, साठ वर्षांचा कलाकार जगन्नाथ जर, ' यवनी नवनीतकोमलांगी'शी प्रणयसंबंध ठेवू शकतो तर, ( श्री. पगडी यांनी ठरवल्याप्रमाणे ) १६२७ मध्ये ३७ वर्षाचा असलेला पंडित जगन्नाथ एका यवनी-तरुणीशी प्रणयसंबंध ठेवू शकणार नाही का ? पण खरी गोष्ट अशी आहे की श्री. पगडी यांनी या लवंगीप्रणयाच्या प्रकरणात एक गोष्ट आरंभापासूनच आपल्या मनाशी निश्चित करून ठेवली आहे; ती ही की जगन्नाथ हा कडकडीत आचरणाचा, सच्छील, तलग ब्राह्मण असल्याने तो या असल्या यवनीप्रणयाच्या फंदात कधीही पडायचा नाही. पण पुढेमागे लवंगीप्रणयकथा खरी ठरली तर ? आणि त्यामुळे पंडित जगन्नाथ ' यवनीसंसर्गदोषभाक् ' ठरू लागला तर ? तर , त्यातून त्याला मुक्त करायला श्री. पगडी यांच्याजवळ एक नामी युक्ति तयारच होती. आणि ती म्हणजे दोन जगन्नाथ एकाच वळी निर्माण करणे-एक कलाकार जगन्नाथ व दुसरा पंडित जगन्नाथ. आणि कलाकार हे चगीभगी अन् रंगेल असायचेच; त्यांना प्रणयाच्या बाबतीत विधिनिषेध कसला ? तेव्हा यवनीप्रणयप्रकरण खरे मानायचे असेल तर, ते कलाकार जगन्नाथच्या बाबतीत खरे माना ( पाहिजे तर ); पण त्या कडकडीत सोवळ्या पंडित जगन्नाथावर मात्र असल्या प्रणयाचा घाणेरडा आरोप करू नका, असा श्री. पगडींचा युक्तिवाद.

## धर्मान्तराचे एक प्रभावी साधन

पण पंडित जगन्नाथाच्या सच्छीलत्वाबद्दल असा निर्वाळा देणे हे धोक्याचे आहे; याचे कारण असे की

१ ' Studies in Literary History, by Prof. P. K. Gode, Vol. II p. 455.








जगन्नाथाच्या वेळच्या मोगल बादशहांच्या, विशेषतः जहांगीर व शहाजहान यांच्या, दरबाराचे वातावरण, लगिक नीतीच्या दृष्टीने इतके मादक, मोहक व ऐष-आरामाचे होते की त्यात राहणाऱ्या, जैन धर्मगुरु, आचार्य, धर्मपरायण ब्राह्मण पंडित, या सर्वांचे नैतिक अधःपतन केव्हा होईल याचा नेम नव्हता. " तत्का-लीन हिंदु समाजातील पवित्र व नीतिमत्तेच्या बाबतीत आदर्श गणल्या जाणाऱ्या व्यक्तींचाही, यवनींशी ( मग त्या थोर कुलातील असोत किंवा हलक्या दर्जाच्या असोत ) संबंध जोडून देण्याचे ( व या युक्तीने त्यांना मुस्लीम धर्मात खेचण्याचे ) बुद्धिपूर्वक प्रयत्न, बाद-शहांकडून, त्यांच्या मुस्लीम सरदारांकडून व बादश-हांच्या बेगमांकडून वारंवार होत असत, " असे विधान करण्याइतका संशयातीत पुरावा आता पुढे येत चालला आहे. अशा तऱ्हेचा पुरावा आपल्यापुढे १७ व्या शतकातील मोगल बादशहांच्या दरबारात जहांगी-रच्या सांनिध्यात राहणाऱ्या एका जैन मुनीने संस्कृत काव्यरूपाने लिहिलेल्या स्वतःच्या चरित्राचे द्वारा सादर केला आहे. या जैन मुनीचे नाव सिद्धचंद्र. ह्याचा गुरु भानुचंद्र हा जैनधर्मातील एक प्रसिद्ध आचार्य असून, त्याला अकबर बादशहाने धर्मचर्चेकरता आपल्याजवळ कायमचे ठेवून घेतले होते. भानुचंद्राचे द्वारा, त्याचा शिष्य सिद्धचंद्र ह्याचाही अकबराशी व त्याच्या कुटुं-बीयांशी घरोब्याचा संबंध जोडला गेला होता. प्रथमतः अकबराने सिद्धचंद्राला राजपुत्र जहांगीरचा शिक्षक म्हणून ठेवले; व पुढे जहांगीर गादीवर आल्यावर त्याच्याजवळ सिद्धचंद्र, त्याच्या मुलांचा शिक्षक व खुद्द जहांगीरचा स्नेही ( स्नेही कसचा? प्रतिष्ठित आश्रित ) म्हणून राहिला. हा सिद्धचंद्र संस्कृत व प्राकृत भाषेचा पंडित व जैनधर्माचा एक प्रमुख धर्मोपदेशक म्हणून प्रख्याति पावलेला होता. बाण-भट्टाच्या कादंबरीवर संस्कृत टीका लिहिणारे भानु-चंद्र व सिद्धचंद्र तेच हे दोन जैनमुनि. या गुरु-शिष्यांच्या जोडीत सिद्धचंद्र हा अत्यंत देखणा, बोलण्याचालण्यात अतिशय चतुर व उच्च दर्जाचा संस्कृत कवी म्हणून प्रख्यात होता. यानेच मम्मटाच्या काव्यप्रकाशावर एक खण्डनात्मक संस्कृत टीका लिहिली असून ती सिंघवी जैन ग्रंथमालेत काही वर्षां-पूर्वी प्रसिद्ध करण्यात आली आहे. त्याचे आत्मचरित्रही त्याच मालेत प्रसिद्ध झाले आहे.

सिद्धचंद्राचा निकट संबंध जसा जहांगीरशी तसा बेगम नूरजहानशी पण आला होता. या जैनमुनीला एखाद्या रूपवती तरुण मुस्लीम युवतीशी प्रणयबद्ध करून मुसलमान करावा असा विचार जहांगीर व नूर-जहान यांच्या मनात एकदा आला. त्याप्रमाणे स्वतः नूरजहानने एकांतात सिद्धचंद्राशी त्या विषयी गोष्ट काढली. ती म्हणाली– ' तुझ्यासारख्या ऐन तारुण्यात असलेल्या देखण्या, चतुर, विद्वान् पुरुषाने मुनिव्रताचा अंगीकार करून आपले आयुष्य फुकट घालवावे हे योग्य नाही. तेव्हा तू आता माझ्या व बादशहाच्या इच्छेला मान देऊन मी पसंत केलेल्या एका रूपवती यवनीशी निका लाव, व जन्मभर आमच्या पदरी रहा. मी तुला बादशहाकडून मोठी जहागीर देववीन. तू जन्मभर आमच्याजवळ आनंदाने रहा. पण माझे हे म्हणणे तू जर अमान्य केलेस तर मात्र बादशहाची तुझ्यावर कायमची गैरमर्जी होइल.

नूरजहानचे हे अकल्पित बोलणे ऐकून सिद्धचंद्र चकित झाला. त्याने तिच्या सूचनेवर विचार करण्या-करिता काही दिवसांची मुदत मागून घेतली व शेवटी मनाशी असे ठरविले की नूरजहानच्या या सूचनेचा स्वीकार करून धर्मभ्रष्ट व पतित होण्यापेक्षा ह्या मोहक व धोक्याच्या वातावरणापासून दूर जावे हेच योग्य. सिद्धचंद्राने असा मनाशी निर्णय घेतल्यावर तो जहांगीर व नूरजहान यांना न कळविता एक दिवशी दिल्ली सोडून गेला व स्वतःच्या गुजरात प्रांतात येऊन राहिला.

सिद्धचंद्राने स्वतःवर आलेल्या या विलक्षण प्रसंगाची हकीकत स्वतःचे नाव देऊन लिहिली नसती तर संस्कृत साहित्यातील एक रम्याद्भुत कल्पित कथा (roman-ce) म्हणून संस्कृत साहित्यरसिकांनी तिच्यावर छाप मारला असता. पण आता तसे करता येणार नाही. सिद्धचंद्राची ही आत्मकथा आता ' मोगल दरबारातील वातावरणावर प्रकाश पाडणारे ऐतिहासिक महत्त्वाचे लिखाण ' म्हणून निर्देश करण्याच्या योग्यतेची मानली जाईल. जगन्नाथाच्या यवनीप्रणयाच्या संदर्भात या 'सिद्धचंद्र चरित्रा'चा उल्लेख मी का केला याचे कारण चाणाक्ष वाचकांना स्पष्टपणे सांगण्याची जरूरी नाही असे

मला वाटते. सिद्धचंद्राची ही आत्मकथा ऐकल्यानंतर सुद्धा प्रखर पंडित, उत्कृष्ट कवी, कलारसिक, श्रेष्ठ प्रतीचा संगीतपद्यरचनाकार, ऐन तारुण्यात असलेला, ' दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः ' । असे स्वतः-विषयी धन्योद्गार काढणारा जगन्नाथपंडित, दिल्लीच्या ऐषआरामाच्या व मादक वातावरणात राहूनही नैतिकदृष्ट्या शुद्ध राहिला होता व त्याच्यावर ' यवनीसंसर्गाचा दोष लादून मोठा अन्याय करण्यात आला आहे ' असे श्री. पगडी खरोखरीच समजत असतील, तर मी येवढेच म्हणेन की, ' ऋजुको ब्राह्मणः । ' (मृच्छकटिक) (ब्राह्मण भाबडा दिसतो)!

## चिमणीचरित्र

श्री. गोडे यांनी जगन्नाथाच्या समकालीन मोगल सरदारांच्या कुटुंबांतील खाजगी वातावरणावर प्रकाश पाडणारे, व ' Mysteries of the Court of Delhi ' हे नाव देण्याला योग्य असे, संस्कृतात लिहिलेले एक प्रणयकाव्य प्रसिद्ध केले आहे. त्याचे नाव ' चिमणीचरित्र '. हे प्रणयकाव्य प्रसिद्ध वैयाकरण भट्टोजी दीक्षित यांच्या नीलकंठ शुक्ल या नावाच्या शिष्याने इ. स. १६५६ च्या सुमारास लिहिले आहे. ह्या काव्यातलि नायिका चिमणी ही यवनतरुणी जहांगीरच्या दरबारातलि सरदार अल्लावर्दीखान नावाच्या सरदाराची सून. हिच्या नवऱ्याचे नाव जाफरखान. चिमणीला त्याकाली सरदारांच्या कुटुंबात उच्च समजले जाणारे शिक्षण देण्याकरिता दयादेव नावाच्या एका ब्राह्मण पंडिताला शिक्षक म्हणून ठेवले होते. चिमणीचा नवरा जाफर हा वारंवार दूर देशी स्वारीवर जात असे. अशावेळी चिमणीचा दयादेवाशी गाढ प्रणयसंबंध जडला. ह्या प्रणया संबंधाची प्रारंभापासून प्रणयाच्या परिणतिपर्यंतची हकीकत या प्रणयकाव्यांत रसालंकारयुक्त काव्यपद्धतीने वर्णिली आहे. श्री. गोडे म्हणतात की हे काव्य संपूर्ण ऐतिहासिक सत्यावर आधारलेले असून त्यावरून तत्कालीन दिल्ली दरबारातील व सरदार घराण्यातील वातावरणाची वाचकांना योग्य कल्पना होते.

जगन्नाथाच्या यवनीप्रेमाच्या संदर्भात या ऐतिहासिक प्रणयकाव्याचा मी येथे मुद्दाम उल्लेख केला आहे.

पण या दोन ऐतिहासिक पुराव्याच्या आधारावर सुद्धा " पंडित जगन्नाथ हा निश्चितपणे ' यवनीसंसर्गदोषभाक् ' असलाच पाहिजे " असे बेधडक विधान करायला मात्र मी तयार नाही; तसे निःशंक विधान करण्याइतका भक्कम व प्रमाणशुद्ध पुरावा अजून बाहेर आलेला नाही. तरीपण वरील पुराव्यावरून जगन्नाथ-लवंगीप्रणयाचे बाबतीत मी इतके तर जरूर म्हणेन की;

' इथे काहीतरी पाणी मुरत आहे'.









श्री. ग. वा. तगारे

# ज्ञानेश्वरीची 'वाशी'-प्रत

धाराशिव ( उस्मानाबाद ) इतिहास संशोधन मंडळाचा अध्यक्ष या नात्याने त्या विभागात संशोधन करीत असता वाशी ( ता. भूम ) येथे मल्लाप्पाण्णा कोरे ( वासकर ) यांचे मठात ज्ञानेश्वरीच्या दोन हस्तलिखित पोथ्या आढळल्या. तुकाराम महाराज-> निळोबाराय--> शंकर महाराज शिऊरकर -> मल्लाप्पाण्णा वासकर या अध्यात्मपरंपरेत जपून ठेवलेल्या आणि पंढरपूरच्या फडात प्रमुख मान मिळालेल्या त्या सत्पुरुषाचे हातची व त्या परंपरेतील संरक्षित अशा त्या पोथ्या पाहून कुतूहल वाटले.

मल्लाप्पाण्णा महाराज हे सोलापूर जिल्ह्यातील करमाळ्या जवळच्या 'इसरेपांडे' गावचे रहिवासी. १८ व्या शतकाच्या शेवटी व १९ व्या शतकाचे सुरवातीस थोर सत्पुरुष, तुकोबांच्या आध्यात्मिक परंपरेचे वारस, महादजी शिंद्यांचे अध्यात्मगुरू, दुसऱ्या बाजीरावांना आध्यात्मिक सामर्थ्याने प्रभावित करणारे संत, असा जरी त्यांचा लौकिक असला तरी त्यांना आपले गाव सोडून शिंद्यांच्या जावयाचे ( वाशीचे देशमुख ) इनामगावी आश्रयार्थ यावे लागले, व अशारीतीने मल्लाप्पाण्णा 'चेंपटया' च 'वासकर' झाले. मल्लाप्पाण्णांनी सेवा म्हणून ज्या ज्ञानेश्वरी पोथीचे लेखन 'शके १७१० कीलक नाम संवत्सरे भाद्रपद वद्य पंचमीला' समाप्त केले त्या पोथीवर स्वहस्ते पुढील नोंद केली आहे :

" लेखन कसबे वांसी माहास्छळे आश्वस्छामा दैवते पुण्यक्षेत्रे मलापा चेंपटे नामाभिधान ग्रंथसंग्रह लखन संपूर्णमस्तुः ॥ छ ॥ छ॥

स्वतः मल्लाप्पाण्णांनी लिहिलेली पोथी म्हणून मला तिच्याबद्दल आदर असला तरी एकनाथी ज्ञानेश्वरीची ती प्रत असल्यामुळे मला तिच्याबद्दल काही लिहावयाचे नाही.

मला आकर्षण वाटले दुसऱ्या पोथीबद्दल. ती शके १७४२ मधील प्रत असली तरी तिच्यामध्ये

" श्री पंधराशे साहोत्तरीं । तारण नाम संवत्सरी ॥ प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखन कामाठी संपूर्ण जाहली ॥४॥

या चार एकनाथी ओव्या नाहीत. हस्ताक्षर 'दिनकर भट जोसी काशेगाव प्रांत बत्ति ( बत्तीस ) सिराळे नजीक कऱ्हाड' यांचे असून त्यानी ती पोथी "दाजी परसपंत कुळकर्णि मौजे गणेगाव प्रगणे भूम' यांचेसाठी 'स्वार्थ परोपकारार्थ' लिहिली. पोथीलेखक बेताताच व्युत्पन्न असला तरी त्याचे समोरील पोथी प्रचलित ज्ञानेश्वरी ( एकनाथी ) प्रतीपेक्षा भिन्न आहे. विशेष म्हणजे १८ व्या अध्यायाचे सुरुवातीला इतर प्रतीत न आढळणारे ५२ ओव्यांचे "मंगळाचरण" आहे. महाराष्ट्र सरकार सध्या ज्ञानेश्वरीची दुसरी आवृत्ति काढीत आहे, अशा वेळी या प्रतीची माहिती प्रसिद्ध करणे अस्थानी होणार नाही.

## पोथीचे वर्णन

पोथीची पत्रसंख्या प्रत्येक अध्यायास भिन्न असली तरी पानाची लांबी २५ सें. मी. व रुंदी ११.५ सें. मी. आहे. उजव्या व डाव्याबाजूस २.५ सें. मी. समास असून खाली व वर २ सें. मी. समास आहे. प्रत्येक पृष्ठावर ११ ओळी असून प्रत्येक ओळीत २३ – २५ अक्षरे आहेत. श्लोक तांबड्या शाईत लिहिले असून टीका ( ज्ञानेश्वरीसंहिता ) नेहमीच्या ( काळ्या ) शाईत आहे.

पोथीच्या वरील पृष्ठावर तिच्या लेखकाचे व मालकाचे नाव पुढीलप्रमाणे आहेः

" दाजी परससंत कुळकर्णि मौजे गणेगाव प्रगणे भूम स्वार्थ परोपकारार्थ यानि असे हस्ताक्षर दिनकर-भट जोसी काशेगाव प्रांत बत्ति सिराळे नजीक कऱ्हाड"

पोथीचा प्रारंभ पुढील प्रमाणे आहे.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीगोपाळ ( ल ) कृष्णाय नमः ॥ श्री ज्ञ (ज्ञा)नेश्वराय नमः ॥ श्रीसद्‌गुरुनाथाय नमः॥ श्रोतावक्ता श्री पांडुरंग समर्थ ॥








वसुदेवसुतं देव कंस चाणु ( णू ) रमर्दनं ( म् ) ।
देवकि (की) परमानं ( दं ) कृष्ण (ष्णं) वंदे जगद्गुरुं ॥

पार्थाय प्रतिबोधिता भगवता नारायण ( णे ) न स्वयं ( म् ) । व्यासेन ग्रथिता पुराणमुनिना मध्ये महाभारते ( तम् ) । अब्द ( द्वै ) तां ( ता ) मृतवर्षणिं ( र्षिणीं ) भगवति ( ती ) मष्टा ( ष्टा ) दशाध्याई ( यि ) नि ( नी )

मंत्वामनुसंदधामि भगवद्गीते भव द्वे ( द्वे ) षिणि ( णीम् ) ॥ २ ॥

श्री सच्चिदानंदाय नमः ।

ॐ नमो श्री आद्या । वेद प्रतिपाद्या ।
जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १ ॥
देवा तु चि गणेश । सकळार्थ प्रकाश ।
म्हणोनि निवृत्तिदास । आवधारिजो जि ॥२॥

## अध्यायवार ओवीसंख्या

'वाशी' प्रत व दांडेकर-प्रत ( प्रसाद प्रकाशन १ली आवृत्ति ) यांच्यातील अध्यायवार ओवीसंख्या पाहणे हे या पोथीचे मूल्यमापन करण्याचे दृष्टीनें उद्बोधक ठरेल

| अध्याय | दांडकरप्रत (ओवीसंख्या) | | वाशी-प्रत (ओवीसंख्या) | | पत्र-संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २७५ | ... | २७६ | | |
| २ | ३७५ | ... | ३७५ | ... | २३ |
| ३ | २७६ | ... | २७६ | ... | ५२ |
| ४ | २२५ | ... | २२५ | ... | — |
| ५ | १८० | ... | १८० | ... | २० |
| ६ | ४९७ | ... | ४९७ | ... | १५ |
| ७ | २१० | ... | २१० | ... | ३८ |
| ८ | २७१ | ... | २७१ | ... | १८ |
| ९ | ५३५ | ... | ५३५ | ... | २२ |
| १० | ३३५ | ... | ३३७ | ... | ४२ |
| ११ | ७०८ | ... | ७०८ | ... | २८ |
| १२ | २४७ | ... | २४७ | ... | ५६ |
| १३ | ११६९ | ... | ११७० | ... | १७ |
| १४ | ४१५ | ... | ४१६ | ... | ७४ |
| १५ | ५९८ | ... | ५९९ | ... | २७ |
| १६ | ४७३ | ... | ४७२ | ... | ४० |
| | | | | ... | ३० |
| १७ | ४३३ | ... | ४३३ | ... | ३० |
| १८ | १८१० | ... | १८१० | ... | १२८ |
| | ९०३२ | | ९०३७ | | |

वाशीप्रतीतील जास्त असलेल्या ५ ओव्या वगळल्या तर दोन्ही प्रती एकच आहेत असा ओव्यांच्या समान संख्येवरून सकृद्दर्शनी ग्रह होतो. सकृद्दर्शनी म्हणण्याचे कारण असे की वाशी-प्रतीत १८ वे अध्यायाचे प्रारंभी 'मंगळाचरणाची टिका' म्हणून ५१ ओव्या दिल्या असून त्या दांडेकरप्रतीतील अकारानुक्रमाची सूचि पाहता कुठेच आढळत नाहीत. त्या ओव्या परिशिष्ट म्हणून प्रस्तुत लेखासोबत दिल्या आहेत. दुसरा मुद्दा असा की ओव्यांच्या समान संख्येपेक्षा पाठभेदांना अधिक महत्त्व असते. तरी माझी महाराष्ट्र सरकारला व विद्वज्जनांना विनंती एवढीच की प्रस्तुत प्रतीतील पाठभेद तपासून तिची ग्राह्याग्राह्यता ठरवावी.

पोथीचा शेवट पुढीलप्रमाणे आहे.

शके बाराशे बारोत्तरे । तै टि ( टी ) का केली ज्ञानेश्वरे ।
सच्ची ( च्चि ) दानंद बाबा आदरे । लेखकु जाहला ॥

शके १७४२ विक्रमनाम संवत्सरे फाल्गुण शुध्द प्रतिपदेस समाप्तः । इदं पुस्तकं दाजि परसरामपंत कुलकर्णि मौजे गणेगाव परगणे शुम याचे आसे-( कातरला गेलेला भाग ) दीनकरभटेन लिखित वृति काशेगाव प्रांत वात. नजीक कऱ्हाड वस्तिबुधयांचे गाव पत्र १२८

## परिशिष्ट

अध्याय १८

### मंगलाचरणाची टीका

[ पुढील ओव्या मुळात होत्या तशा— शुद्धीकरण न करता— दिल्या आहेत. जोशी—पोथीलेखक यांचेवर अन्याय न व्हावा म्हणून ही दक्षता घेतली आहे. ]

श्रीकृष्णपरमात्मनाय नमः । श्री ज्ञानेश्वराय नमः । आष्टादशा आध्यायनिर्मळ । निर्विघ्न संपावा सकळ । यालागी केले मंगळ । ज्ञानेश्वरी ॥ १ ॥ ते गुरुदेवता अनुसंधान । श्रीविठल गुरुपद स्मरोन । यथामति निर्वचुन । वाखाणिजेल ॥२॥ निर्मळादि संबोधिनी । देवाते आभिमुख करूनी । उत्कर्ष प्रार्थिला मनी । जयजय शब्दे ॥३॥ निर्मळादि रूप देवा । सांडुनी आविद्यक-








भावा। निजबोधे विश्वसंभवा। सर्वोत्कर्षे वर्ते ॥ ४॥ निर्मळादि संबोधने। त्याचा भावार्थ यथाज्ञाने। जे रचिले शास्त्रानुसंधाने। वाखाणिजेतो ॥ ५॥ त्यात निजमायामुळ। कल्पित जो देहादि मळ। जो जया चिन्मात्री ढवाळ। म्हणौनि

[ पान बदलले नवीन पृष्ठ ]

निर्मळ ॥६॥ निजजन जे निर्मळ। आंतर्मुख विवेकशिळ। त्याचे आखळि हि मंडळ। आपणाचि जो ॥७॥ जन्मजरादि सकळ। जो चिदाकाशि मेघमंडळ। तयाते करी निर्मळ। वायुजैसा ॥ ८॥ स्वरूपमर्यादेकरून। येक सरेचि प्रपंचभान। निर्दळी तो कर्ण। म्हणौनि प्रबळ ॥९॥ नाममात्रें सकळ। विश्वचि करि मंगळ। आमंगळाचे पटळ। निवारी जो ॥ १०॥ निगमागम संज्ञक। वेदशास्त्रे आनेक। तया वृक्षाचे फळ येक। प्रतिपाद्य ॥ ११॥ जो कर्मफळाचा दाता। सकळ जो सर्व सत्ता। विगत विषय जे सत्वता। त्याचा वछ(च्छ)ळ जो ॥ १२॥ काळ जो वत्सरादिक। जन्ममरणादि त्याचे कौतुक। ते आकळिले जेणे देख। तो कळित काळ कौतुहळ ॥ १३॥

( नवीन पृष्ठ )

याचि कारणें काळातित। काळ प्रकाशिला जेणे नित्य। जग विकरता आ ( अ ) विकारित। म्हणौ ( नि ) निश्चळ ॥ १४ ॥ चळित म्हणिजे चंचळ। चित्ते जे वृत्ति गोळ। त्याचे पान म्हणिजे सकळ। प्राशन करणे ॥१५॥ चिद्भासित ज्या वृत्ति। त्या चित्रि समावति। आसतीच कांहीं नसति। दिपजैसा ॥१६॥ तेणे करि जो तुंदिल। पूर्णत्व जय आढळ। दोंद चढले केवळ। आनंदाचे ॥ १७ ॥ जगाचे उन्मिळण। जगद्रचना आनोअन। तेथे अविरळ पाजे व्यापुन। भोगलानसे ॥१८॥ निर्विशेष स्फुरणकळा। तेचि केळि म्हणजे सहजलिळा। ते प्रिय जयाची निष्फळा। तो केळिप्रिय ॥ १९ ॥ षोडश कळाचे लिंग। तो न लगेचि जेथे वंग। बोलिला निर्विभाग। निष्कळ पदे ॥ २० ॥

[ नवीन पृष्ठ ]

स्फुर ब्र ( ह्म ) आमंद। म्हणिजे आपरिछी ( छि ) न्न आनंद। तेणें बहळ म्हणिजे निर्द्वंद्व। चिन्मात्रत्वे ॥२१॥ आविद्यक जे मळ। ते चिद्रुपत्वे सकळ। नित्य निस्त ( ? ) सर्वकाळ। नसति जेथे ॥ २२॥ आ ( अ ) विचारे प्रति ( ती ) यमान। मिथ्या जे प्रपंच भान। त्याचे जे आधिष्ठान। मूळभूत ॥ २३॥ स्वप्रभ म्हणिजे स्वप्रकाश। आणि जग जे आंबुदाभास। ते ज्याचे गर्भि सावकाश। ते नभचि जो ॥ २४ ॥ भुवनोद्भवारंभ। त्रिभुवनाचा प्रारंभ। त्याचा जा मुळस्तंभ। अधिष्ठानतत्त्वे ॥ २५॥ भव जो संसार। त्याचा ध्वंश म्हणिजे नाश कर। आणि शुद्ध जो निर्विकार। चिन्मात्रत्वे ॥ २६ ॥ विदुदय शब्दे कर्ण। गुरुशास्त्र यज्ञज्ञान। ते उद्यानशब्दे उपवन। तेथे आरविंद जो ॥ २७॥ आरविंद म्हणिजे कमळ। ते

उपवनीच जैसे उत्फुल्ल । तसा ... तत्व ज्ञानीचि केवळ । प्रकाश जो ॥ २८ ॥ येथें ऐसेहि सूचिले । वन जैसे शोभे कमळे । तैसे तत्वज्ञान मी रचले । जयाचे नि ॥ २९ ॥ येन्हवी ते हि पाहाता । आज्ञान कार्य चि तत्वता । परि विषय वळे चिद्घनता । समळ शुद्ध ॥ ३० ॥ शमदम भेद । आपणचि जो देहबद्ध । आणि दया अतिशुद्ध । तिचा आर्णव जो ॥ ३१ ॥ नाथवा शमदमभेद । आणि दया ज अतिविषद । त्याचा आर्णव-छपिजे समस्तपद । चरणद्वयीयेक ॥३२॥ त्यांत शमदम प्रसिद्ध । मनो वहिरिंद्रिय निरुद्ध । आहंकार क्षये मदभेद । दया कृपा ॥३३॥ आविद्येक विकार । भासताहि नानाकार । जो येकरूप निसार । निर्विशेषत्वे ॥ ३४ ॥ अनुसरले जे निःकाम । तयाचा कंदर्प म्हणिजे काम । तोचि सर्प संसारश्रम । विषाते प्रेरि ॥ ३५ ॥ तयाचा दर्प जो काहि । वेग आविच्यार वाहि । ती अतिकृत म्हणिजे पाहि । नाशिला जेणे ॥ ३६ ॥ भक्त जे आंत-मुंख जन । त्याचा भाव म्हणिजे आंतःकरण । तेचि भवन प्रकाशस्छान । तेथे दिपचि जो ॥ ३७ ॥ येन्हवा भक्त जे कोण्ही । त्याचे हृदय भुवनी । प्रकाश येणेच करूनी । परि - सिते न स्फुरे ॥ ३८ ॥ जो तापत्रय नाशक । आद्वितीय एक । परिनत जे साधन एक । ह्या (?) सी परमैक प्रिय ॥ ३९ ॥ निजजन जै भक्त । त्यासी भजनीय शेवो (?) पभक्त । माया - म्य आनात । मायेचेनि जो ॥ ४० ॥ जो त्रिभुवनैक श्रीगुरु । आकल्पना कल्पतरू । म्हणिजे कल्पना ह्या - संसारू । नाशिता जो ॥ ४१ ॥ प्रसिद्ध जो कल्पतरू । तो कल्पिता करि विस्तारु । तैसा नव्हे हा आपारू । न कल्पिताहे ॥ ४२ ॥ आहो कल्पित जे फळ । तयाचे कल्पना मुळ । जे कल्पित केवळ । कल्पना नाशे ॥ ४३ ॥ पाविजे कल्पना नाश । हाहि भाव जेथे नसे । नित्य प्राप्तचि आभासे । पाविजे शास्त्रे ॥ ४४ ॥ कल्पना नाशे शास्त्र । बुध्दि ते करि पवित्र । प्राप्ति ते येता वन मात्र । जाणा विसंगती ॥ ४५ ॥ चिन्मात्री परिछिन्नता । ते चि जाणावि बुद्धि संता । ते कल्पना नाशे नासता । चिन्मात्रचि उरे ॥ ४६ ॥ ऐसे हि काहि नाही । जे काहि नाशोनि उरे काहि । स्फुरणरूप प्रवाहि । आखंडताचि आसे ॥ ४७ ॥ ऐसया फळाचा दाता । म्हणसे आखंड स्वरूप सता ( त्ता ) । आकल्पना कल्पतरूता । या लागी बोलिली ॥ ४८ ॥ स्वसं विछंदे करूनी । आपले स्वविशेषमान । ते ... म्हणिजे वृक्ष संज्ञ । ... व्हिस्वभावे ॥ ४९ ॥ तयाचे जे बीज । चिदाभास जे सहज । त्याचे प्ररोहण शब्दे निज । प्रवाहे स्पष्टता ॥ ५० ॥ तयाचि जे आवनी । भुमीका-क्षेत्रस्छानी । आधिष्ठान म्हणौनि । बोलिजे शास्त्री ॥५१॥

ही मंगळचरणाची टिका । श्रीगोपालकृष्णायनं [मः]

वरील पोथीतील हा ५१ ओव्यांचा उतारा मला पुरविल्याबद्दल व टिपणे घेण्यासाठी मूळ पोथी दाखविल्याबद्दल सध्याचे वाशीचे मठाधिपति श्री. कोरे यांचा मी आभारी आहे.

---











अनुक्रमणिका

श्री. श्री. न. गजेंद्रगडकर

# भा षा शा स्त्र

## ( १ ) भाषा– स्वरूप व कार्य

भाषाशास्त्र म्हणजे भाषेचा शास्त्र यादृष्टीने अभ्यास. भाषेच्या सर्व घटकांची परीक्षा हा त्या शास्त्राचा विषय. ध्वनि, वर्ण, वर्णसमूह, वर्णसमूहांचे एकमेकांशी असलेले संबंध, त्यांचे शब्दात होणारे विकार, शब्दसमूह, शब्दांना विधानात होणारे विकार, या सर्वांचा अभ्यास म्हणजे भाषाशास्त्राचा अभ्यास होय. भाषाशास्त्रात व्याकरणाचा अभ्यास समाविष्ट आहे. परंतु व्याकरण म्हणजेच भाषाशास्त्र नव्हे. शिवाय निव्वळ धातुरूपात्मक अभ्यास हेच व्याकरण नसून कोणती रूपे केव्हा व का वापरली जातात, त्यांचा परस्परसंबंध, या सर्वांचा विचार भाषाशास्त्र करते. एक विशिष्ट भाषा त्यात अभिप्रेत नाही. भाषाशास्त्रज्ञ म्हणजे कोणी अनेक भाषापटु नव्हे. केवळ भाषा म्हणून भाषेचे कार्य काय असते, ती ते कार्य कसे पार पाडते, ह्याचा विचार भाषाशास्त्रात केला जातो. बोली, भाषा व लेखन ह्यांचा एकमेकांशी काय व कशा प्रकारचा संबंध आहे याची तपासणी देखील भाषाशास्त्राच्या अभ्यासात अन्तर्भूत आहे. यामध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ, विदग्ध-प्राकृत, प्रतिष्ठित किंवा पुढारलेल्या समाजात बोलली जाणारी– गरीब किंवा मागासलेल्या समाजात बोलली गेलेली– वगैरे प्रकारचा भेदभाव भाषाशास्त्रामध्ये केला जात नाही. भाषा कोणत्या प्रकारचे लोक बोलतात, त्या भाषेची वाङ्मयसंपत्ति किती आहे याचा विचार भाषाशास्त्र करीत नाही. यामध्ये फक्त भाषेचे पृथक्करण, त्यामधील घटकांचा पूर्ण अभ्यास, विविध घटकांचा एकमेकांशी असलेला संबंध, यांचा विचार केला जातो. जेव्हा आपण विशिष्ट समाज एकभाषिक आहे असे म्हणतो तेव्हा तो गट जी भाषा बोलतो त्या भाषेची पद्धति व निरनिराळ्या व्यक्ती भाषा वापरताना योजतात ते शब्दप्रयोग, यामध्ये भेद करणे आवश्यक आहे. भाषाशास्त्राचा संबंध पहिल्याशीच म्हणजे भाषापद्धतीशी आहे. एकाच भाषेमध्ये जे व्यक्तिनिष्ठ शब्दभेद, वाक्यभेद आढळतात–बरेचसे बरोबर, काही चूक देखील– त्या व्यक्तिनिष्ठ भाषाप्रयोगांचा अभ्यास प्रामुख्याने भाषाशास्त्र करीत नाही. या सम्बन्धात प्रथमतः भाषा म्हणजे काय व ती आपले कार्य कशा तऱ्हेने पार पाडते हे पाहणे अगत्याचे आहे.

### विचारविनिमयाचे साधन

जगाच्या उत्पत्तीपासून लोकांचे आपापसातले दळणवळण शक्य व सोपे करणारे भाषा हे एक पहिल्या प्रतीचे साधन आहे. वस्तुतः भाषा ही एक सर्वश्रेष्ठ सामाजिक संस्थाच आहे. भाषा नसेल तर दळणवळण, विचारविनिमय, किंबहुना एका अर्थाने मानवाची सुधारणा किंवा प्रगति शक्य नाही. कोणत्याही प्राणिमात्राच्या गटास एकमेकाशी दळणवळण ठेवण्यास काहीतरी साधन हवे. पशु–पक्षी, मानव ह्या सर्वांनाच अशा तऱ्हेच्या साधनांची जरूरी आहे. ह्याचाच अर्थ सर्वांना एकप्रकारची भाषादेखील आहे. अर्थात त्या भाषेचे स्वरूप गटानुसार भिन्न असणारच.

भाषेची उत्पत्ति कशी झाली याबाबत अजून खात्रीने काही सांगता येत नाही. याबाबत निरनिराळे सिद्धान्त जरी मांडले गेले असले तरी ते तर्कच आहेत. सभोवताली ऐकलेल्या आवाजाच्या अनुकरणातून भाषा उत्पन्न झाली असावी असा एक सिद्धान्त मांडला गेला आहे. त्याचप्रमाणे परिस्थितीशी झगडत असता मानवाने काढलेल्या उद्गारातून किंवा क्षोभातून उत्पन्न झालेला आवाज म्हणजे भाषा किंवा सभोवतालच्या परिस्थितीला प्रतिसाद म्हणून काढलेले तत्सम आवाज भाषेच्या उत्पत्तीचे कारण, अशा निरनिराळ्या उपपत्ती मांडल्या गेल्या असल्या तरी अजून याबाबत ठामपणे काहीही सांगणे कठीण आहे. म्हणूनच पॅरिस येथील भाषाशास्त्रज्ञांच्या सभेमध्ये बरीच वर्षे भाषेच्या उत्पत्तीवर निबन्ध वाचण्यास बंदी होती ! निष्पन्न काही न होता निवळ वादतरंग निर्माण होतील हीच ह्या बंदीच्या मुळाशी असलेली साधार भीती ! आपल्या सध्याच्या








विवेचनासाठी आपण एवढेच लक्षात ठेवू की उत्पत्तीचे कारण काहीही असो, भाषा हे एक दळणवळणाचे, विचारविनिमयाचे, साधन असून सर्व प्राणीमात्र अशा प्रकारचे काहीतरी साधन वापरतातच.

## मानव आणि मानवेतर यांची भाषा

जरी सर्व सचेतन प्राण्यांमध्ये दळणवळण, विचार-विनिमय आढळतात, तरी वस्तुतः मानव हाच एक द्विपाद प्राणी आहे की ज्याला 'भाषा' अवगत आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे की इतर सजीव प्राणी एकमेकाशी दळणवळण करू शकत नाहीत किंवा आपल्या भावना व गरजा व्यक्त करू शकत नाहीत. इतर प्राणी-मात्र जरूर दळणवळण करतात, आपल्या गरजा व्यक्त करू शकतात. फक्त मनुष्य व इतर प्राणी ह्यांच्या दळण-वळणाच्या साधनांमध्ये काही फरक आहेत. हे फरक समजून घेणे मनोरंजक व उपयोगी ठरेल. म्हणून प्रथम आपण मानवेतर प्राण्यांमध्ये दळणवळण कसे असते ते तीनचार उदाहरणांवरून पाहू. १ ले उदाहरण मधमाशांचे. एखाद्या मधमाशीस जेव्हा मध सापडतो तेव्हा ती पोळ्यामध्ये जाऊन एक प्रकारचा नाच करते. त्या नाचातील विविध मुद्रान्वये किंवा हालचालींतर्फे कोठे मध आहे, कोणच्या दिशेस तो आहे, अंतर किती आहे, हे इतर मधमाशांस समजते. हे जे अर्थवाही संकेत आहेत ते सहजप्रवृत्त असून अत्यंत मर्यादित स्वरूपाचे आहेत. म्हणजेच हे दळणवळण मधाच्या बाबतीतच शक्य आहे. ही पद्धत इतर बाबतीत लागू पडत नाही. इतर दळणवळण फारसे नाही. असल्यास नाच हे त्याचे माध्यम नाही. नंतरची पायरी म्हणजे Stickleback नावाचा मासा. जननकाली नरमासा समुद्राच्या किंवा नदीच्या तळाशी एक घरटे बांधतो व ज्या मादीचे पोट आतील अंड्यामुळे पुढे आलेले असते अशाच मादी-भोवती तो नाचत रहातो. त्याची प्रतिक्रिया म्हणून ती मादी त्याच्या मागोमाग घरट्यात जाते. घरट्यामध्ये तो आपल्या चोचीने तिचे पोट घासतो. ती मादी अंडी घालून निघून जाते व नंतर तो नर आपले रेतुक (sperm) त्या अंड्यावर सोडतो. या ज्ञारिक घटनेमध्ये जे दळणवळण आहे ते देखील सहजप्रवृत्तच आहे. शिकून आलेले नाही. त्यात ध्वनि नाही तर सूचक स्वरूपाच्या हालचालीच साधन म्हणून आहेत. याच्यानंतर Herring Gulls पक्षी ज्या तऱ्हेने आपल्या पिल्लांची काळजी घेतात ते पाहिले तर या साधनांच्या विकासामधील आणखी एक वरची पायरी आपणास आढळते. अंड्या-तून पिले बाहेर आल्यावर ती आपल्या आईबापांच्या चोचीवर चोच मारून अन्न मागतात. लहानलहान घास करून आईबाप त्यांना भरवतात. ही क्रिया– म्हणजे भूक लागली असता खाणे मागणे व ते देणे– जरी सहज-प्रवृत्त असली तरी ह्यात काहीअंशी तरी शिकण्याच्या क्रियेला स्थान निश्चित आहे. जसजसे दिवस जातात तसतसे पिल्ले जास्ती सुलभतेने व सफलतेने चोच मारून आपले खाद्य भरपूर व लवकर मिळवू शकतात. म्हणजेच शिकून ही क्रिया जास्ती सुकर व व्यवस्थित होते. यात **शिकविण्याची क्रिया नाही**, फक्त **शिकण्याची आहे.** नंतरची पायरी म्हणजे Gibbon प्राण्यांमधील दळण-वळण. हे प्राणी निरनिराळ्या नऊ प्रकारांनी आपल्या सोबत्यांना साद देऊन आपल्या मनातील भावनाविचार व्यक्त करतात. समोरून येत असलेला प्राणी शत्रू आहे किंवा मित्र आहे हे सांगण्यासाठी एक प्रकारचा आवाज, संकटामध्ये एकत्र येण्यासाठी किंवा विभागले जाण्यासाठी निरनिराळ्या पद्धतीचे आवाज, हे प्राणी काढतात. ह्या व्यवहारामध्ये **शिकणे व शिकवणे** या दोन्हीही क्रिया आहेत.

## भाषेचे अविभाज्य घटक

वरील उदाहरणांवरून आपल्या लक्षात येते की मनुष्याप्रमाणे इतर सचेतन प्राण्यांमध्ये देखील दळण-वळण, विचार-विकार यांची अभिव्यक्ति आहे. फक्त दळणवळणपद्धतीमध्ये महदंतर आहे. इतर सचेतन प्राण्यांच्या सूचक हालचाली व मानवी भाषा यातील प्रमुख फरक सात प्रकारचे गणले आहेत. भाषेचे स्वरूप द्विविध असते. वर्ण हा बोलीचा मूळ घटक. अर्थ हे तिचे प्रधान कार्य. साहाजिकच वर्णव्यवस्था (arrangement of phonemes) व शब्दव्यवस्था (arrangement of morphemes) हे भाषेचे अविभाज्य घटक आहेत. हे द्वित्व प्राण्यांच्या सूचक हालचालीत सापडत नाही. भाषेचा दुसरा गुण म्हणजे उत्पादनक्षमता. सहजप्रवृत्त हालचालीत नवीन प्रकारचा बदल फारसा होत नाही. विशिष्ट हालचाली विशिष्टच संदेश देतात. याच्या उलट भाषा ही उत्पादन-










अनुक्रमणिका

क्षम आहे. म्हणूनच भाषेमध्ये वर्ण व शब्द नवीन प्रकारे वापरले जावू शकतात. स्वतंत्रपणाने मुलाने वर्णोच्चार किंवा शब्दोच्चार केला म्हणजे त्याला भाषा अवगत झाली असे आपण मानतो. या भाषेच्या गुणामुळेच वक्ता पूर्वी न वापरलेले शब्द योजून आपले म्हणणे श्रोत्यांना समजावू शकतो. पूर्वी न ऐकलेले शब्द श्रोते समजू शकतात. तिसरा फरक म्हणजे शब्द व अर्थ ह्यांचा संबंध. हे नाते निव्वळ पूर्वापार चालत आलेल्या संकेतावर अवलबून असून शब्दाचे रूप, आकार व त्या शब्दाशी निगडित असलेला अर्थ ह्यामध्ये काहीही कार्यकारणभाव नाही. नादानुकारी शब्द फक्त वरील गुणाला अपवाद असू शकतील. परतु तेथे सुद्धा योगायोगाचा अंश आहेच. अदलाबदल हे भाषेचेच आणखी एक वैशिष्ट्य आहे. प्रत्येक वक्ता हा श्रोता असू शकतो व दुसरा बोललेले समजल्यानंतर तेच स्वतः बोलू शकतो. ही अदलाबदल ज्या साधनामध्ये देवाणघेवाण आहे तेथेच संभवते. जेथे दळणवळण एकमार्गीच असते तेथे वरील प्रकारची अदलाबदल शक्य नसते. मधमाशांचा नाच व गिब्बन्स् प्राण्यांचा आवाज यामध्ये हा गुण आढळतो. stickleback माशामध्ये हा गुण नाही. सिंहगर्जना ऐकून हरिण पळून जाते परंतु हरिणानी केलेल्या ओरडण्याने सिंह हालत नाही.

## संकेत व सहजप्रवृत्त हालचाली

भाषेचा पाचवा गुण म्हणजे संकेताच्या विशिष्टपणात वाढ. ज्यावेळेला एका हालचालीतून दुसरी हालचाल सलगपणे सुरू होते त्यावेळेस हा विशिष्टपणा सर्वात कमी असतो. पाटपाणी करताना पाहून जेवण्यासाठी हात धुऊन येणे ह्या दोन हालचालीचे नाते सलग असते. परंतु जेवण तयार आहे हे ऐकल्यानंतर हात धुवून जेवायला येणे या संबन्धातील संकेत विशिष्टपणे बनलेला असतो. भाषेची उपयुक्तता त्याच्या सहाव्या गुणावर फारच अवलंबून आहे. सहजप्रवृत्त हालचाली स्थल, कारण व घटना ह्यांच्याशी संलग्न असतात. भाषेच्या घटकांची अवस्था तशी नाही. वर्ण व शब्द हे भाषाघटक आपण स्थलकालनिरपेक्ष वापरू शकतो.

## संस्कृतीचे संक्रमण

भाषेचा सर्वात मोठा उपयोग संस्कृतिबाबत आहे. भाषेतून संस्कृतीचे संक्रमण होत असते. भाषा ही निव्वळ शिकली जात नाही, तर ती शिकवली जावी लागते. संस्कृतीचा एक भाग म्हणून भाषेचा वारसा पिढ्यान्‌पिढ्या पुढे जात असून ह्याचा बराचसा भर अनुकरणावर असतो.

भाषेची वर वर्णिलेली सात वैशिष्ट्ये मानवेतर प्राण्यांमध्ये आढळत नाहीत. एखाद्या प्राण्यामध्ये एखादा गुण आढळतो. परतु सातही गुण मनुष्य सोडून दुसऱ्या कोणत्याही प्राण्यामध्ये नाहीत. हीच भाषेची अपूर्वता.

वर्ण व शब्द ह्यांनी घडलेल्या भाषेचे सर्व विशेष समजल्यानंतर भाषाशास्त्र भाषेची फोड कशी करते ते आता पाहू या. भाषाशास्त्रामध्ये भाषेकडे प्रथमतः व प्रामुख्याने ते एक दळणवळण शक्य व सोपे करणारे साधन या दृष्टीने बघितले जाते.

## भाषेच्या दळणवळणाची सामग्री

दळणवळणाचे साधन म्हटले की त्यात खालील गोष्टी येणारच, मग ते माध्यम नौदलामध्ये वापरतात त्याप्रमाणे निरनिराळ्या रंगाची निशाणे असोत, मॉर्स्-कोड असो, किंवा भाषा असो.

दळणवळणाच्या साधनामध्ये अन्तर्भूत होणाऱ्या गोष्टी म्हणजे उद्गमस्थान, आवाजनिर्मितीसाठी लागणारी यंत्रसामुग्री, ध्वनिप्रवाहाचे साधन, ध्वनिलहरींचा ग्राहक व अंतिमस्थान; भाषेमध्ये वरील दृष्टीने पाहिल्यास खालील घटक आढळतात.

उद्गमस्थान म्हणजे भाषा बोलणारा मनुष्य;
यंत्रसामुग्री म्हणजे ध्वनि-यंत्रणा;
साधन म्हणजे वायु.
ग्राहक म्हणजे ऐकणाराचे कान
अंतिमस्थान म्हणजे मेंदु

दळणवळणाच्या कोणत्याही साधनामध्ये दोन गोष्टी अंतर्भूत आहेत. एका टोकास काही संकेत बनविले जातात व दुसऱ्या टोकास ते संकेत उलगडले जातात. मॉर्स् कोडमध्ये एका स्टेशनवरून संदेश दुसऱ्या स्टेशनवर अशाच तऱ्हेने पाठविला जातो. संदेश पाठवणारा ० ० - किंवा - - ० अशी संकेतात्मक भाषा वापरतो. दुसऱ्या स्टेशनवरील तारमास्तर तोच संदेश उतरून घेऊन त्या संकेताची फोड करतो. निरनिराळ्या रंगाच्या निशाणांनी नौदलामध्ये जेव्हा संदेश पाठविले जातात तेव्हा नेमके हेच होते. आधी संकेत ठरवावयाचा की

तांबडे निशाण म्हणजे धोका. हिरवे निशाण म्हणजे यश. व नंतर त्याप्रमाणे निशाणे फिरवावयाची. म्हणजेच यात दोन गोष्टी अभिप्रेत आहेत. (१) संकेतीकरण. (२) संकत-फोड. निरनिराळ्या साधनांमध्ये निरनिराळे संकत योजले जातात. काही ठिकाणी टिम्बे-रेघा, क्वचित् निशाणे तर भाषेमध्ये ध्वनि.

### ध्वनिसंकेत म्हणजे भाषा

संकेत म्हणजे कोणत्याही चिन्हावरून बसविलेली पद्धती. मनुष्याने भाषेसाठी चिन्हे म्हणून ध्वनीचा उपयोग केला आहे. हे ध्वनिसंकेत म्हणजेच भाषा. ध्वनि वापरण्याचे कारण असे की दुसऱ्या कोणत्याही चिन्हावर आधारलेल्या पद्धतीने आपले कार्य नीटपणे व पूर्णतेने झाले नसते. समजा चिन्हे म्हणून आपण रंग वापरले तर ? आधीच रंग थोडे– सात किंवा आठ. ते कमी पडतात म्हणून त्यांची मिश्रणे बनवून आणखी रग बनविता येतील. परंतु पुष्कळशा सारख्या दिसणाऱ्या रंगांनी जर मनुष्य आपले विचार-विकार, अनुभव, दुसऱ्याला सांगू लागला तर मनावर फार ताण पडेल. रंग कितीही कुशलतेने मिसळले तरी ते पुष्कळसे सारखे दिसणारच. त्यामुळे त्यामधून विचार-विकार प्रकट केले जात असता गोंधळ होणे साहजिकच आहे. शिवाय कितीही मिश्रणे केली तरी निष्पन्न होणारे रंग मर्यादितच असणार. तसेच, रंग दृष्टिगोचर असल्यामुळेसुद्धा रंगाची उपयुक्तता स्थलमर्यादित रहाणारच. ज्या प्रमाणात गोंधळ व अनिश्चितता त्याप्रमाणात माध्यमाची कार्यक्षमता कमी. रंग उपयोगी पडत नाहीत म्हणून अंक वापरले तरीदेखील तीच अडचण. एकतर मूळ आकडे मर्यादित–नऊच. अर्थात त्यांचे वाटेल तितके नवीन आकडे बनविता येतील. परंतु त्यातर्फे आपण आपले विचार मांडू लागलो तर किती त्रास होईल तो बघा. 'आपण आज संध्याकाळी बटाटयाच्या चाळीला जाऊया का ?' असे विचारावयाचे असल्यास ७१९, ४३, ५८३४२०, ६९३१२, —— अशा तऱ्हेची सांकेतिक भाषा निर्माण होईल. ज्या प्रमाणात विचार प्रगल्भ होत जातील, अनुभवाचे क्षितिज वाढत जाईल त्याप्रमाणात आकड्यांची गुंता-गुंत चक्रव्यूहाप्रमाण जास्तीच गोंधळात पाडणार. याच्या उलट असंख्य निरनिराळे ध्वनि आपण काढू शकतो. म्हणूनच ध्वनि हेच संकेताचे साधन मानले गेले. दळणवळणाच्या–विचारविनियमाच्या–कोणत्याही साधनामध्ये यंत्रसामुग्रीच्या एका बाजूस जितकी माहिती आपण भरू शकू तितकी साधारणतः दुसऱ्या बाजूने बाहर पडली पाहिजे. जे विचार वा अनुभव आपण व्यक्त करू इच्छितो ते सर्व साधारणतः ऐकणाराच्या कानी पडले पाहि-जेत. परतु असे होत नाही. जितकी माहिती किंवा विचार आपण ध्वनि तर्फे व्यक्त करतो तितकीच माहिती किंवा विचार ऐकणारापर्यंत पोचत नाहीत. याचाच अर्थ हे माध्यम शभर टक्क कार्यक्षम नाही. विचारविनिमयाच्या माध्यमाची कार्यक्षमता साधारणपणे तीन गोष्टींवर अव-लबून असते — (१) संकेतीकरण व त्याची फोड या बाबतीतील नियम (२) मार्ग (३) कार्यनिष्पन्न होण्यास लागणारा वेळ. संकेताबाबतचे नियम ज्याप्रमाणात सरळ, सुलभ व योग्य त्या प्रमाणात ते माध्यम कार्यक्षम. ज्या मार्गे ते संकेत जाणार तो मार्ग जितका शांत, अडथळे जितक कमी तितक्या प्रमाणात कार्यक्षमता अधिक. कार्याला लागणारा वळ जितका कमी तितका भाषेचा उपयोग जास्ती.

### भाषेतील व्यर्थता उपकारक ठरते

वरील प्रकारच्या कोणत्याही साधनामध्ये विचार-अनुभव व्यक्त करण्यासाठी असलेली शक्ती व वस्तुतः वापरलेली शक्ती यामध्ये फरक आढळतो. तो फरक म्हणजेच त्या यंत्रणेतील अपव्यय. उपपन्न शक्ति ( theoritical capacity ) उणे वास्तविक शक्ति म्हणजेच त्या यंत्रणेतील व्यर्थता ( वाया गेलेली शक्ती Redundancy ). ही व्यर्थता निरर्थक आहे असा मात्र याचा अर्थ नाही. सर्वसाधारणतः व्यर्थता किंवा पुनरुक्ति हा शब्द आपण दैनंदिन व्यवहारात किंवा वाङ्मयात जेव्हा वापरतो तेव्हा तो एक दोष आहे असे आपण म्हणू इच्छितो. उदाहरणार्थ सह्याद्रि-पर्वत भारतीय लोक, माडाचे झाड असे म्हटल्यावर एका शब्दाची पुनरुक्ति उगीचच केली असे आपण मानतो. परंतु तसा अर्थ येथे अभिप्रेत नाही. विचारविनिमयाचे साधन म्हणून भाषेचा अभ्यास करताना आपणास असे दिसते की भाषेमध्ये भासणारा हा अपव्यय– ही व्यथता– निरुपयोगी तर नाहीच, उलट ती आव-श्यकच आहे. किंबहुना या व्यर्थतेमुळेच भाषा आपले कार्य योग्यपणे पार पाडू शकते. एखादी व्यक्ती जेव्हा ध्वनिद्वारा आपले विचार लोकांपुढे मांडते तेव्हा










अनुक्रमणिका

वक्त्यापासून श्रोत्याच्या कानात पोचेपर्यंत काही ध्वनि मार्गदोषामुळे किंवा बोलणाऱ्याच्या व्यक्तिगत दोषांमुळे वाटेतच लुप्त होतात. म्हणजेच ऐकू जात नाहीत. तरीसुद्धा व्यक्त केलेले विचार ऐकणाराला व्यवस्थितपणे समजतात. याचाच अर्थ असा की वाटेत त्या लुप्त झालेल्या किंवा अस्पष्टपणे ऐकलेल्या ध्वनींची गरज नव्हती. त्या ध्वनींनी आपले कार्य पार पाडले नाही म्हणून कार्यक्षमतेत काही फरक पडला नाही. 'मी सकाळी नीट जेवलो नाही' म्हणून मला आता भूक लागली आहे हे वाक्य जरी 'मी तकाली नीत जेवला ना—त्या वार भूग लागली—' असे ऐकू आले तरी योग्य तो अर्थबोध होतोच. भाषेतील किंवा तत्सम कार्यासाठी योजलेल्या अन्य साधनातील ही 'व्यर्थता' निव्वळ अभावात्मक कार्य करत नाही तर प्रत्यक्षपणे उपकारकच ठरते. सर्व भाषेत ही व्यर्थता आढळते. इंग्रजीमध्ये ती जवळजवळ ५० टक्के आहे. मात्र ही व्यर्थता एखाद्या भाषत प्रमाणाबाहेर असल्यास त्या भाषेची कार्यक्षमता अर्थातच कमी होईल. म्हणूनच ह्या व्यर्थतेस ताब्यात ठेवण्यास भाषेत असलेली संक्षिप्तता (abbreviation) उपयोगी पडते. सर्वनामे व इतर संक्षिप्त शब्द पुष्कळशी माहिती संदर्भानुसार देतात. व्याख्यासुद्धा अशाच प्रकारचे कार्य करतात.

## भाषेतील 'पोकळी'

एकमेकातील व्यवहार शक्य व सोपे करण्यासाठी, अनुभव व्यक्त करण्यासाठी, विचारविनियमासाठी वापरलेले एक साधन म्हणून जे ध्वनिसंकेत आपण वापरतो तीच भाषा. ती एक सामाजिक संस्था आहे. म्हणूनच "समाजातील दळणवळण, विचारविनिमय शक्य करणारी ध्वनिसंकेतात्मक पद्धति म्हणजे भाषा" अशी भाषेची व्याख्या आपण करू शकतो. ध्वनि, ध्वनिसमूह, आकांक्षा योग्यतानुसार त्यांची विशिष्ट रचना या सर्वांचा अन्तर्भाव पद्धतीमध्ये होतो. कोणत्याही भाषेमध्ये सगळेच ध्वनि सगळीकडे वापरले जात नाहीत. काही ध्वनि विशिष्ट जागीच आढळतात. भाषेचे हे एक वैशिष्ट्य आहे. उदाहरणार्थ, इंग्रजीमध्ये सुरवातीस sp, st, sk, असा ध्वनिगट आढळतो. परंतु sb, sd, sg, असा तत्सम ध्वनिसमूह वापरला जात नाही. म्हणजेच s हा दन्त्यसीत्कार व त्याच वर्गातील कठोर स्फोटक (ओष्ठ्य-तालव्य-मध्य तालव्य) सुरवातीस एकत्र येतात पण तोच सीत्कार व मृदु स्फोटक एकत्र येऊन शकत नाहीत. तसेच tr-thr-dr हे ध्वनिसमूह इंग्रजीत वापरतात पण tl –;thl;–dl;– हे नाही. मराठीमध्ये दन्त्य द्रववर्ण–ल– सुरवातीस आढळतो पण मूर्धन्य 'ळ' सुरवातीस येत नाही. ध्वनीच्या उपयोगावरील हे निर्बन्ध म्हणजेच भाषेतील पोकळी. अशा तऱ्हेची पोकळी-मग ती नियमानुसार असो किंवा यदृच्छया असो– सर्व भाषात आढळते. भाषेच्या अभ्यासात याचा अभ्यास देखील समाविष्ट आहे.

## ध्वनि व अर्थ यांचा नैसर्गिक संबंध नाही

भाषेमध्ये जे संकेत आहेत त्याच्यामागे काहीही कारणमीमांसा नाही. ते संकेत न्यायशास्त्रावर आधारलेले नाहीत. ते निव्वळ लोकव्यवहारावर अवलंबून आहेत. कुत्रा हा प्राणी श्वा – कुत्ता – कुत्रा – Hurd – Canis – Chier – अशा प्रकारच्या निरनिराळ्या ध्वनिसमूहाने निरनिराळ्या भाषेत ओळखला जातो. याच्या उलट एकच ध्वनिसमूह निरनिराळ्या भाषेत वेगवेगळे अर्थ दाखवितो. du हा ध्वनिगट इंग्रजीमध्ये do 'करणे' ह्या अर्थी. जर्मनमध्ये 'तु' व फ्रेंचमध्ये 'दोन' ह्या अर्थी वापरतात. म्हणजेच ध्वनि व त्यानी व्यक्त होणारा अर्थ किंवा दर्शवलेला पदार्थ यामध्ये कोणताही नैसर्गिक सम्बन्ध नाही. हा केवळ एक संकेत आहे. व्यवहारासाठी पहिल्यापासून लोकांनी मान्य केलेला संकेत आहे. असे नसते तर, भाषा कोणतीही का असेना प्रत्येक पदार्थ सारख्याच ध्वनीने व्यक्त झाला असता. म्हणजेच एकच भाषा अस्तित्वात आली असती. कदाचित यामुळे जगात जास्ती शांतता नांदली असती किंवा सलोखा उत्पन्न झाला असता ते निराळे! ही संकेताची कल्पना नवीन नसून संस्कृत साहित्यकार व ॲरिस्टॉटल यांनी पूर्वीच मान्य केलेली आहे.

वरील विवेचनावरून भाषाशास्त्रात भाषेकडे कोणत्या दृष्टीने पाहिले जाते याचा अंदाज. येईल दळणवळणासाठी, विचारविनियमासाठी, योजलेले एक साधन या दृष्टीने भाषेचा अभ्यास भाषाशास्त्र करते.

श्री. ह. रा. दिवेकर

# चिंग लिंग*

अहिल्योत्सवाचे दिवस. एका सर्वोदयकार्यकर्त्याने मला सर्वोदय-साहित्य-प्रदर्शन पहावयास नेले. तेथे माझ्या नजरेस पडले 'चिंगलिंग–निर्मला देशपांडे'. नावानेच मी आकृष्ट झालो. लगेच ते पुस्तक मी विकत घेतले व वाचून काढले. पुस्तकातच दिलेल्या एका वाक्याप्रमाणे 'आपल्या पित्याप्रमाणेच ही मुलगी उत्तम कादंबऱ्या लिहू लागेल' असा विश्वास मला वाटला.

चिंगलिंग ही पेकिंगमधील एका प्राध्यापकाची कन्या. हा प्राध्यापक एका चिनी जमीनदाराचा मुलगा. शिक्षणासाठी हा अमेरिकेत गेला व तेथेच अमेरिकन संपन्न पतिपत्नीच्या मुलीशी त्याचा विवाह झाला. या दुहेरी मिश्र विवाहाचे फळ म्हणजेच चिंगलिंग. हे नाव हिच्या शेतकरी आजोबांनी ठवलेले. हिची अमेरिकन आजी हिला म्हणावयाची रिटा. रिटाचा वर्ण होता चिनी पिवळा पण नाक डोळे होते आजी-सारखे अमेरिकन; म्हणजे धारदार नाक व निळे डोळे. यामुळे ही चीनमध्ये अमेरिकन ठरे व अमेरिकेत चीनी. पण परकी पडे चीनी मैत्रिणीत व अमेरिकन मैत्रि-णीतही. चिंगलिंग विलक्षण बुद्धिमान व उत्कृष्ट भावना-शील होती. बाराव्या वर्षी फ्रेंच राज्यक्रांतीची पुस्तके वाचून हिच्या मनावर जो ठसा उमटला तो असा की क्रांति तर व्हावी पण ती गिलोटीन व कत्तलीच्या मार्गाने होऊ नये.

पुढे जपानने चीनवर आक्रमण केल व चीन–जपान लढाई सुरू झाली. या लढाईच्या सर्वात कठिण काळात म्हणजे १९४२ त रिटाचे पपा ममीस म्हणाले, "तूं चिंगला अमेरिकेत घेऊन जा. इथे रोजचे बॉम्बहल्ले सुरू असताना हिचे शिक्षण कसे होणार ? दूर गेली तर सुरक्षित तरी राहील पोर." पण ममीने निक्षून सांगितले "चीनच्या या आणीबाणीचे प्रसंगी इथे राहण्यातच तिला अनेक गोष्टींचे शिक्षण मिळेल. माणूस पुस्तकातून का सगळे शिकतो ? दूर सुरक्षित राहील पण स्वत्व गमावील." रिटा तेथेच राहिली. लढाई संपली. चीनचा विजय झाला. चिआंगकाई शेकचा कारभार सुरू झाला व त्यात चिंगच्या पपास मंत्रिमंडळात शिरावे लागले. लढाईच्या विध्वंसानंतर पुनर्निर्माणाचे फार मोठे कार्य व्हावयाचे होते. ते नुसत्या भावनेने होणारे नसून त्यासाठी ज्ञानाची आव-श्यकता होती. ते मिळविले तर चिंग चीनची चांगली सवा करू शकेल म्हणून चिंगला अमेरिकेत पाठविण्यात आले. बिचारी पुन्हा चीनला परत येऊच शकली नाही.

लढाई संपली होती. जपान शरण आलेले होते. चीनमध्ये विजयोल्लास दिसण्यापूर्वी दुसरेच दृश्य दिसू लागले होते. गृहयुद्धाला तोंड लागले होते. कम्यु-निस्ट फौजा उत्तरेकडून – येनानकडून– वेगाने पुढे येत होत्या. आपली सेना संख्येने व शस्त्रबळाने मोठी असल्याने चँगच्या पक्षास असे वाटे की लालसेनेस आपण सहज चिरडून टाकू. तरीही तडजोडीच्या गोष्टी चालूच होत्या. चिंगचे पपा तड-जोडीस तयार होते, पण सत्तासंपत्तीने मदांध झालेल्या त्यांच्या पक्षनेत्यांस ते पटले नाही. गृहयुद्धास जोराने तोंड लागले. आपणास काही करता येत नाही असे पाहून चिंगच्या पपानी राजीनामा दिला व ते आपल्या खेडेगावी जाऊन राहिले. आपली जमीन त्यांनी शेत-कऱ्यास वाटून दिली व आपल्यापुरती ठेवून राखली. इकडे चीन सरकार लाल झाले. मोठ मोठे लोक तारवानला जाऊन राहिले. चिंगच्या मनात घरी जावयाचे असता-नाही अभ्यास सोडून तिने येऊ नये म्हणून ते तिला गोडगोड पत्रे पाठवीत. पण एके दिवशी बातमी येऊन थडकलीच की लाल शिपायांनी चँगच्या मंत्रिमंडळा-तून राजीनामा दिलेल्या मंत्र्यास ते आपल्या गावी बायकोसह राहत असता जाळून टाकिले. चिंग पोरकी झाली व तारवानला गेली असता तिला कळले की ती

* **चिंग लिंग**— ले० निर्मला देशपांडे प्र० परंधाम प्रकाशन–पवनार किं. ३ रु. पृ. २२६








चीनलाही पारखी झाली ! बिचारी परत अमेरिकेस गेली.

पण अमेरिका तिला काय हवे होते ते देऊ शकत नव्हती. सबब 'काय हवे' याचा शोध करण्यास ती भारतात येण्यास निघते. तिच्या प्राध्यापकाची अंतःकरणपूर्वक इच्छा असते की तिने आपला बौद्ध दर्शनावरचा प्रबंध पुरा करून मग जावे. पण तिचे बेचैन झालेले मन तिला तसे करू देत नाही. 'पुढच्या वर्षी नक्की परत येते' असे सांगून अमेरिकन नागरिक म्हणून ती येथे येते व विनोबांच्या चळवळीत मिळते. ठरल्याप्रमाणे वर्षभरानंतर ती परत जाते व अभ्यास पुरा करून अडीच वर्षांनी पुनश्च येथे येऊन पूर्वीच्याच आंदोलनात भाग घेते, तो अगदी लालचीनने तिबेट पादाक्रांत करून भारतावर आक्रमण करी पावेतो; चिंगचा हा सारा अनुभव लेखिकेने या कादंबरीत ग्रथित केला आहे. एखादा कुशल विणकर एखाद्या विशिष्ट विणीत आडवे उभे तंतू असे विणतो की त्याचा विरलपणा नजरेस पडतच नाही. अगदी तशाच कौशल्याने चिंगच्या चीन-अमेरिकेतील गत गोष्टी व भारतातल्या वर्तमान गोष्टींची गुंफण या कादंबरीत झाली आहे. असे सांगतात की शंकराचार्यांनी विशिष्ट अनुभव घेण्यास परकायाप्रवेश केला होता. निर्मलाताईंनी परान्तःकरणप्रवेश केला आहे व तो अशा सूक्ष्म रीतीने की चिंगचे चीनी मनःसंगीत आपल्या इवल्याशयाही भारतीय स्वराने बदसूर होऊ दिले नाही. या कादंबरीचे सर्वात मोठे वैशिष्ठ्य हेच होय.

लेखिकेने चिंगला अंतर्बाह्य चीनी संस्कृतीत मुरविले आहे; चीनी लोकांसारखे स्वतःचे नाकडोळे नसूनही तिला आवडते मात्र असेल नसेल इतपत असणारे नाक आणि सपाट चेहऱ्यातले दोन चांदण्यासारखे लुकलुकणारे बारीक डोळे. चीन देशातील बुद्धमूर्तींचा हिच्या मनावर असा संस्कार झालेला दाखविला आहे की बोधगयेच्या मंदिरातील सुंदर बुद्धमूर्तीही तिच्या उंच नाकामुळेच तिला खटकते. त्रिवेंद्रमच्या कुशल कारागिराने हस्तिदंताची सुबक राधाकृष्णाची केलेली मर्ति, तिच्यातील राधेच्या आठवारी नेसलेल्या लुगड्यामुळे जशी उत्तर हिंदुस्थानच्या व्रजवासी माणसास खटकते तशीच. तिला वाटते बुद्धाचे नाक असे हिमालयासारखे उंच असते तर हिंदुस्थानातील बुद्धधर्म हिमालयापलीकडे चीनमध्ये कसा जाऊ शकला असता ? असे नाक असले म्हणजे दोन डोळे हिंदुस्थान चीनसारखे एकमेकास दुरावतात. दोन डोळ्यांची सतत भेट होऊ देणारे यांगत्सी नदीच्या खोऱ्यासारखे सपाट नाकच तिच्या डोळ्यांना सुंदर दिसते. त्यामुळेच महाराष्ट्र देशातल्या सुधीरची पामीरच्या पठारासारखे नाक असलेली दीपा तिला सुंदर वाटते व तिच्या धाकट्या मुलाच्या नाकाला पत्ताच नाही असे ऐकल्यामुळे ती त्याला अधिक खाऊ पाठविते. हे झाले मनाचे बाह्य आकर्षण !

आता मनातले संस्कार. भारतातल्या खेड्यातली लहान लहान मातीची घरे, भोवतालची शेतांची रांगोळी, सूर्याला साथ देत दिवसभर राबणारे शेतकरी, मध्ययुगातील साधनांनी गृहकार्ये पार पाडणाऱ्या गृहिणी, मातीत खेळणारी उघडी नागडी अस्वच्छ व अशक्त मुले आणि निसर्ग, मानव व परिस्थिति यांनी निर्माण केलेल्या संकटांचा सतत सामना करीत असनाही आढळणारे अनाकलनीय समाधान पाहून कुमारी मेयोप्रमाणे तिला तिटकारा वाटत नाही. उलट तिच्या अंतरंगातल्या चीनशी सादृश्य दिसल्यामुळे तिला सहानभूति वाटते. श्रीरंगमच्या काळ्या विष्णूची भव्य शेषशायीमूर्ति पाहून तिला बुद्धदेवाच्या महापरिनिर्वाणाची आठवण होते. नटराजाचे नृत्यात तिला धर्मचक्रप्रवर्तनाची स्मृती येते व मीनाक्षीच्या रूपाने तिला मायादेवी दिसू लागते. फार काय बोधिवृक्षाच्या छायेतले रिक्तासन पाहून मिटलेल्या तिच्या डोळ्यांना आसनावर बसलेले ध्यानस्थ, भूमिस्पर्शमुद्रेतले बुद्धदेव दिसतात व या बिनडोळ्याच्या दर्शनाबरोबर बिनाकानाचे श्रवण चाललेले असते "नमु अमिताभ... सद्धर्मपुंडरीक... नमु अमिताभ" अशी रंगलेली चिंग लेखिकेने आपणास दाखविली आहे.

आपल्यातले दोष आपणास दिसत नाहीत व आपल्याच लोकांनी ते दाखवावे हे आवडतही नाही. आईने कितीही हळू कान धरला व कसल्याही हळूवारपणाने सुई टोचली तरी अज्ञानी मूल रडून रडून आकांत करते, पण सोनार कान टोचीत असता भेदरलेल्या डोळ्यांनी व आवळलेल्या ओठांनी ते








त्याकडे पाहतच राहते. लेखिकेने म्हणूनच की काय चिंगच्या दृष्टीस आपली त्रिंगे पाडली आहेत व तिच्या मुखाने त्यास वाचा फोडविली आहे. दीपाने आपल्या आश्रमात लावलेली सुंदर व्यवस्था, तिच्यावर पडणारा ताण, मुले होतच राहिल्यामुळे होणारा त्रास, ' नई तालीम 'च्या सातवीपर्यंतच्या शिथिल शिक्षणाने त्यांच्या पुढच्या आयुष्यांत त्यांचा कसा निभाव लागणार ही चिंता, व तशा दूरच्या खेडेगावी आजारी पडल्यास होणारी दुर्दशा, या साऱ्या गोष्टी चिंगच्या ध्यानी येतात. त्याचप्रमाणे मद्रासेकडील नटराजनने आपल्या पार्वतीस ' चांगला डोस् ' देण्याचे सांगताच तिने ताडकन् दिलेले " घरात दोन्ही मुले अजून ल्हान आहत. शिवाय तुम्ही कधी आम्हास तुमचे काय काम आहे ते समजावून सांगता ? बाहेर व्याख्याने देता तसे एखादे घरात दिले असते तर ? पण तुमचे मुळी घराकडे लक्षच नाही " असे उत्तर चिंग ऐकते. त्यामुळे क्रांतीचा सगळयात कच्चा दुवा कोणता ते तिच्या लक्षात येते. आमचे लुळे झालेले हे अर्धांग समर्थ न करिता आम्ही समाजाचे परिवर्तन करू पाहतो. स्वतःचे घर, स्वतःचे कुटुंब, यात परिवर्तन न घडवून आणता साऱ्या समाजाचे कुटुंब करून एवढा अवाढव्य समाज बदलविण्याची हाव धरतो !

चिनी संस्कृतीत पण अमेरिकन संवयीत वाढलेल्या चिंगच्या मनास हे कूट सुटत नाही की अगदी सहज साधणाऱ्या सुखसोई देखील हे भारतीय का करीत नाहीत ? जेवणासाठी खीर पुरी करतील पण कसल्यातरी जमिनीवर नुसते पाणी शिंपडून कुठल्यातरी अस्वच्छ पानाच्या न धुतलेल्या पत्रावळीवर व द्रोणात ते पदार्थ वाढतील. शास्त्रात सांगितलेल्या शुद्धीसाठी मलमूत्रविसर्जन, मुखप्रक्षालन व स्नान केल्याशिवाय जेवणार नाहीत, पण या क्रिया करण्यासाठी योग्य अशा जागा निर्माण न करिता त्या हव्या तिथे करतील व शुद्धतेच्या नावाखाली अधिक घाण करून ठेवितील ! पण याचे कारण म्हणजे तसे करण्यात काही वावगे आहे हे या गोष्टीची सवय जडलेल्या त्यांच्या मनास वाटतच नाही. हे दाखविण्यासाठीच की काय लेखिकेने जिमी व हेलन या अमेरिकन जोडप्यास चिंगबरोबर काम करावयास भारतात आणले आहे. जिमी हा अमेरिकन तरुण भारतीय तरुणाप्रमाणे नुसता विचार करीत बसत नाही. कारण तो असे जीवन कंठण्यास पुण्यदायक तपस्या समजत नाही. तो असे जीवन जगणे लाजिरवाणे किंवा आमच्या भाषेत पाप समजतो, व ते दूर करण्यास झटणे यात माणुसकी किंवा आमच्या भाषेत पुण्यदायक तप समजतो. म्हणूनच खेड्यातील साधने वापरून काय काय सुधारणा करता येतील याचा तो विचार करतो, इतर देशात हे प्रश्न कसे सोडवितात याचे अध्ययन करितो आणि सहा महिन्याचे आत काही सुधारणा करून दाखवितो. आमचे शहरी सुशिक्षित म्हणविणारे पुस्तकपाठी तरुण आधी खेड्यात जाणारच नाहीत. गेले तरी अशा प्रकारचे शारीरिक किंवा बौद्धिक श्रम त्यांचे हातून होणार नाहीत, आणि जिमीसारखा तरुण दिसला तर ' अनाठायी श्रम करणारा वेडा तरुण ' ही पदवी त्यास बहाल केल्याशिवाय राहणार नाहीत.

सवयीचा परिणाम केवढा होतो हे चिंगच्या दुसऱ्या एका गोष्टीवरून छान व्यक्त होते. चिनी लोकांत मुलींचे पाय लहानपणापासूनच बुटात बांधून ठेवीत असत. चिंगची आई त्या प्रथेविरुद्ध भाषणे देई. चिंगला आईचे विचार पटत पण आजीचे लहान लहानसे सुंदर पाय आवडत. मुलींनी पाय बांधले नाहीत तर आजीस चिनी संस्कृति बुडाल्यासारखे वाटे. आपल्याकडे नाही का ब्राह्मणांनी शेंडी जानवे टाकले, मुसलमान स्त्रियांनी बुरखा फेकला, हिंदु स्त्रियांनी कुंकू व मंगलसूत्राचा त्याग केला तर तसेच वाटत ? पण या बाह्य गोष्टीत साठलेली संस्कृति विज्ञानाच्या या युगात कशी टिकणार ? हरिजनांना देवापासून दूर ठेवल्याने हिंदु संस्कृति बुडत नाही. जबरदस्तीने धर्म लादला जाऊ नये या पैगंबराज्ञेचे उल्लंघन करण्याने इस्लामला धक्का पोचत नाही, किंवा दुष्काळात झाडपाला खाऊन जगण्याचा प्रयत्न करीत मरणारांना न वाचविले तर चिनी संस्कृति नष्ट होत नाही. या साऱ्या गोष्टींच्या मुळाशी एकच गोष्ट आहे व ती म्हणजे विचारस्वातंत्र्य नसणे व विचार न करणे. या विचारशून्यतेमुळेच भलभलत्या कल्पनांच्या आहारी जाऊन आम्ही आमचे तत्त्वज्ञान श्रेष्ठ, आमची संस्कृति प्राचीन, हजारो वर्षे टिकलेली अशा फुकाच्या ऐटीतच वावरत असतो. पण जो पावेतो संस्कृति या प्रकारच्या बाह्य गोष्टींवर अव-








लवून आहे आणि तत्त्वज्ञान ग्रंथात व देवघरात कोंडलेले आहे, तोवर चीनसारखाच आमचाही पराभव होणे फार संभाव्य आहे. ती संस्कृति व ते तत्त्वज्ञान जर जीवनात उतरले नाही तर ते पोकळ तत्त्वज्ञान व ती फुग्यासारखी फुगलेली संस्कृति एखादी वावटळ आली असता पाल्या पाचोळ्या सारखी उडून जाईल ही गोष्ट आम्ही चांगली ध्यानात ठेवली पाहिजे.

चीनचा असाच पराभव का झाला याचे विवेचन फारच हृदयंगम रीतीने केले आहे. साम्राज्यवादी देशाशी लढणे सोपे आहे, कारण साम्राज्य हे दुष्टशक्तीचे प्रतीक असते. स्वातंत्र्य मिळविण्यासाठी माणसे प्राणपणाने झुंझतात. पण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लोकांस लढाई नको असते. त्यांना मग हवी असते सुख देणारी शांति व पोट भरणारी भाकरी. आणि जे सरकार ती देऊ शकत नाही त्याविरुद्ध लोक गेल्याशिवाय राहत नाहीत. ही शांति, पुष्टि, धृति मिळण्यास उशीर लागणार हे जनता जाणून असते. पण तिची खात्री पटावी लागते की तिने निवडून दिलेले सरकार त्या दृष्टीने पावले टाकीत आहे. लोकशाहीतल्या लोकांची जेव्हा ही खात्री पटत नाही तेव्हांच या गोष्टीची आश्वासने देणाऱ्या साम्यवादाचा विजय होतो. चीनमध्ये तो तसा झाला व हिंदुस्थानात तो तसा होण्याची संभाव्यता चिंगला दिसली. गरीबांच्या उद्धारासाठी स्वराज्य आवश्यक आहे, पण स्वराज्य हे अंतिम साध्य नसून वरील गोष्टी प्राप्त करून घेण्याचे ते साधन आहे. ते साधन हाती असले तरच क्रोध, हिंसा, युद्ध इत्यादींचे प्रयोग न करिता प्रेम, करुणा, मैत्री इत्यादि गोष्टींनी शांति, पुष्टि, धृति इत्यादि गोष्टींची प्राप्ति सुकर आहे. पण त्यासाठी आता हे नुसते शब्दप्रयोग चालणार नाहीत तर प्रेम, करुणा, मैत्री इत्यादींची शक्ति प्रकट झाली पाहिजे. अहिंसेची शक्ति गांधींनी प्रकट करून दाखविली व प्रेमाची शक्ति आज विनोबा प्रकट करून दाखवीत आहेत.

पण जेथे पिकते तेथे विकत नाही. महात्माजींनंतर या सद्‌गुणांची शक्ति प्रकट करण्याचे सामर्थ्य विनोबाइतके कुणीच केले नाही. सबंध भारतभर ते हिंडले, त्यांच्या प्रेमाच्या शिकवणीस अनुसरून त्यांच्या अनुयायांनी लाखो एकर जमीन मिळविली, असंख्य गावी त्यांची व्याख्याने झाली. त्यांचे साहित्याचीही विक्री भरपूर झाली. पण ते नीट वाचले कितीकांनी याविषयी जबरदस्त शंका येते ! आणि वाचून ते समजणाऱ्यांची संख्या तर विचारात घेण्यासारखी नाहीच ! परदेशातून काही विद्यार्थी त्यांच्या पदयात्रेत सामील झाले, पण भारतातल्या आधुनिक तरुण विद्यार्थीस ते फारसे आकृष्ट करू शकले नाहीत. याचे कारण असे असू शकेल की आजचे भारतीय तरुण तत्त्वचिंतनास अगदी विटले आहेत. ते नाटके वाचतील, काव्यांचे अनुशीलन करतील, कथाकादंबऱ्यांची पारायणे करतील. पण तत्त्वज्ञान म्हटले की त्यांच्या कपाळास आठ्या पडतील ! तत्त्वचिंतन, गहन विचार, गंभीर चर्चा या गोष्टींचे आज तरुणांशी वावडे पडले आहे. तेव्हा हे विचार जर त्यांच्यापुढे ठेवावयाचे असतील तर ते त्यांना आवडणाऱ्या रूपातच शर्करावगुंठित औषधासारखे द्यावे लागतील. या दृष्टीने निर्मलाबाईंच्या या कादंबरीचे विशेष महत्त्व आहे. विनोबांचे सारे सिद्धान्त या कादंबरीत ग्रथित झाले आहेत पण ते वाचताना आपण कुठेही ते सिद्धान्तरूपाने वाचीत आहोत असे वाटत नाही. कादंबरी वाचता वाचता ते आपोआप मनात घोळू लागतात व चिंगलिंगच्या आकर्षक कथेबरोबर त्यांचा विचार करावाच लागतो. मराठी वाचक या कादंबरीचा सत्कार करतील व यातील विचारांचे थोडे तरी चिंतन करतील अशी आशा करावयास हरकत नाही

इतर भाषात इचा अनुवाद होणे आवश्यक वाटते.

---








श्री. न. र. फाटक

# साहित्य आणि इतिहास

इतिहास म्हटला की त्या त्या देशातील राजांनी वेळोवेळी एकमेकांवर केलेल्या स्वाऱ्या, त्यापासून जनतेला सोसावा लागलेला छळ, हालअपेष्टा, राजपुरुषांचे वध इत्यादिकांची माहिती असा इतिहासाचा अर्थ रूढ झालेला आहे. गेल्या शतकात इंग्लंडच्या एकदोन इतिहासकारांनी राजांच्या स्वाऱ्या, मोहिमा, विजय किंवा अपजय, राजघराण्यातले खून यांची विचारपूस करण्याचे सोडून लोकांनी निर्मिलेल्या साहित्याच्या आधारे जनतेच्या जीवनाचा प्रवाह कसा चालू होता, याचे विवरण केले व आता त्यांच्या यशस्वी प्रयत्नामुळे सामाजिक जीवनाच्या वृत्तान्ताला इतिहासात स्थान दिले जाऊ लागले आहे, किंबहुना मानवाच्या साऱ्या हालचाली, त्यांची कारणे व फळे हे सांगितल्याखेरीज इतिहास पूर्णच होऊ शकत नाही, अशी इतिहासाची व्याख्या सर्वमान्य झाल्यासारखी आहे. राजे आणि त्यांचा कारभार यांचा मानवीजीवनावर होणारा परिणाम प्रस्तुत व्याख्येने सोडलेला नाही. 'राजा कालस्य कारणम्' हे महाभारतातील वचन महत्त्वाचे आहे व त्याचा प्रभाव इतिहासात दिसतो. आपल्या देशाच्या इतिहासाकडे पाहिल्यास मुसलमान व ब्रिटिश राजवटीने हिंदु व हिंदी समाजाच्या आचारविचारात उत्पन्न केलेले फेरबदल त्या वचनाची यथार्थता पटविणारे आहेत. परंतु एकट्या राजाखेरीज दशात जी सामान्य जनता सदैव नांदते तीही एक प्रचंड शक्ति आहे. राजेलोकांप्रमाणे नगारे शिंगे न वाजविता व राजांचे अत्याचार सोसूनही आपले जीवन बिनबोभाट अखंड ही जनता चालतीत राहाते, त्या जीवनाचे कालानुसार बदलणारे प्रतिबिंब वाङ्मय, चित्रे, शिल्प अशा रूपाने अभ्यासकांना पाहायला सापडते; या प्रतिबिंबांच्या साहाय्याने मानवाचा इतिहास अधिक संपन्न होऊ शकतो, हे लक्षात घेऊन सांप्रत त्यांचा इतिहासलेखनात योग्य मान ठेवण्याचा स्पृहणीय प्रयत्न सुरू आहे. ही व्यापक दृष्टी बाळगून महाराष्ट्राच्या इतिहासाची साहित्याच्या साहाय्याने थोडीशी पाहाणी करण्याचा विचार आहे. हा विचार किंवा प्रयत्न अगदी नवा आहे असा मात्र समज करून घेऊ नये.

### महाराष्ट्रातील जीवनासंबंधी निर्देश

रामदेराव यादवावर अल्लाउद्दीन खिलजीची धाड महाराष्ट्रात शिरण्यापूर्वी ज्ञानेश्वर होऊन गेले. त्या धाडीच्या आधी ज्ञानेश्वरांनी गीताटीका आणि अनुभवामृत यांची रचना केली. गीताटीकेत मूळ गीतेच्या तत्त्वज्ञानाचे स्पष्टीकरण आहे, अशा समजुतीने त्या टीकेचे परिशीलन केल्यास तिच्यात इतस्ततः आलेले तत्कालीन महाराष्ट्रीय जीवनासंबंधाचे निर्देश एकदम ध्यानात येत नाहीत व त्या निर्देशांना ऐतिहासिक महत्त्व असल्याचा बोध आकलन होत नाही. उदा० १३ व्या अध्यायातील ज्ञानाची लक्षणे सांगून झाल्यावर त्या लक्षणांच्या उलट जे असेल ते अज्ञान एवढ्या अर्थाचा एक चरण गीतेत असता ज्ञानेश्वरांनी त्यावर लांबलचक विवेचन केलेले आहे व त्यातला काही भाग इतिहासाला उपकारक ठरतो. अज्ञानी मनुष्य कोणत्या ग्रंथांची अथवा विषयांची आवड बाळगतो, हे स्पष्ट करताना ज्ञानेश्वरांनी पुराणे, ज्योतिषशास्त्र, कोकशास्त्र इत्यादिकांची मोठी यादी मांडलेली आहे. देवांच्या संबंधातील लोकांचा व्यवहार कसा चंचल होता, कोणत्याही एका देवदेवतेबद्दल लोकात दृढ निष्ठा नव्हती, याबद्दलच्या चर्चेत ज्ञानेश्वरांनी तिथिवारानुसार अनेक देवदेवतांना आणलेले आहे. चतुर्थी आली की गणपतीची आराधना करणे, पंचमीला नागोबाच्या पूजेस धावणे, चतुर्दशी आली की दुर्गादेवीला शरण जाणे, घरच्या देवाला कोनाड्यात ठेऊन तीर्थास जाऊन तेथे देवाचा शोध घेणे, अशा रीतीने व्यभिचारिणी भक्तीचा ज्ञानेश्वरांनी उपहास केलेला आढळतो. राजस, तामस तपाच्या विवेचनात त्यांनी ज्या उपद्व्यापांचे चित्र रेखाटले आहे त्यात जारणमारणाच्या क्रिया दिसतात. त्या क्रिया

आज साफ लोपून इतिहासजमा झालेल्या नसल्या तरी त्यांचे स्वरूप हल्ली पालटले आहे, असे विचारान्ती कबूल करावे लागेल. ज्ञानेश्वरीतील असे भाग एकत्र केल्यास यादवराजवट समाप्त होण्यापूर्वी लोकांचा व्यवहार कित्येक बाबतीत कसा होता, याचा अंदाज करता येतो. कोणी ज्ञानेश्वरकालीन सामाजिक जीवनाला इतिहासात गोवण्याचे मनावर घेतल्यास ज्ञानेश्वरीतील येथे सांगितलेल्या भागाचा निस्संशय उपयोग आहे. त्याच काळातील महानुभाव संप्रदायाचे वाङ्मय ज्ञानेश्वरीत न सापडणाऱ्या सामाजिक जीवनाच्या गोष्टींची भर टाकणारे आहे.

## धर्माचारातील स्थित्यंतराची साक्ष

ज्ञानेश्वरानंतर वाङ्मयदृष्ट्या एकनाथापर्यंतचा सुमारे दोनशे वर्षांचा काळ अंधकारमय आहे. इ. सन १३५० च्या आगे मागे स्थापन झालेले बहामनी राज्य दीडशे वर्षांनंतर मोडले. त्याची पाच शकले झाली. ही दोनशे वर्षे अतिशय धुमाकुळीची होती, यामुळे सामाजिक स्थितिगतीचे निरीक्षण करण्याचे जे वाङ्मय हे साधन त्याची यथासांग निपज होण्याला सवडच नव्हती. एकनाथांनी ज्ञानेश्वरीचा व ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार केला ही प्रसिद्ध कथा मधल्या काळात ज्ञानेश्वरी अतिशय मागासली होती, याच्या पुराव्यासारखी आहे. एकनाथांच्या काळी लोकांच्या धर्माचारात झालेल्या स्थित्यंतराची साक्ष एकनाथांच्या वाङ्मयात भरपूर आहे. दावलमलकासारख्या पीराची पूजा, त्याची गदा खांद्यावर मिरविणे, त्याच्या दरग्यात उष्टे खाणे, या प्रकारचा उल्लेख एकनाथांच्या स्फुट कवितेत आहे. महारांचे अर्ज ( अर्जदास्त ) या प्रकरणात खेड्यातील पाटील, कुळकर्णी, महाजन, शेटये, ( केव्हा केव्हा पाटलीणसुद्धा ) ही मंडळी गांवकऱ्यांना कसे छळीत होती किंवा छळीत असते, याची विदारक चित्रे रेखाटून एकनाथांनी खेड्याची दुर्दशा निदर्शनास आणलेली आहे. हिंदु-तुर्कसंवाद या प्रकरणात एकमेकांच्या धर्मातील उणीवा दाखविता दाखविता शेवटी दोन्ही धर्मातील देवांचे अंतिम स्वरूप सारखेच, हा निष्कर्ष एकनाथांनी उघडकीस आणला आहे. त्यावरून हिंदु-मुसलमानातील भेदाचे व ऐक्याचे दर्शन घडते. रुक्मिणीस्वयंवर आणि भावार्थ रामायणातील सीता-स्वयंवर या प्रसंगांच्या वर्णनात एकनाथांनी नळे, चंद्रज्योति, चिचुंद्र्या, वगैरे आतषबाजी आणलेली आहे. महाराष्ट्रात आतषबाजी केव्हा प्रचलित झाली हे निश्चितपणे सांगणे कठिण असले तरी एकनाथांच्या वेळी ती प्रचलित होती, इतकी की थोरामोठ्यांची लग्ने आतषबाजीने साजरी करण्याचा प्रकार रूढ झाला होता, असे ठासून म्हणता येते. ही अग्निक्रीडा मुसलमानांनी लोकांना परिचित करून दिली, ही गोष्ट वादातीत आहे. इसवी सनाच्या सोळाव्या शतकाच्या शेवटी महाराष्ट्रातील जीवनाची माहिती देताना अग्निक्रीडा ( आतषबाजी ) सांगणे प्राप्त आहे. एकनाथांच्या हयातीत तोफांचा उपयोग लढायातून फारसा केला जात नसावा. त्यांनी वर्णिलेल्या युद्धात तोफांचे उल्लेख नाहीत. पचमहाभूतांपैकी तेजाची अंगोपांगे स्पष्ट करताना रामदासांनी तोफा जमेस धरल्या आहेत. भावार्थ रामायणातील रामरावणाच्या युद्धात कित्येक घटना अशा दिसतात की, त्यावरून मुसलमानांचा युद्धोपचारांचा हिंदूच्या अंगवळणी पडलेला प्रभाव स्वच्छ निदर्शनास येतो.

## अत्तर-गुलाब, मिरपुड-मिरची

हल्ली सभा- समारंभांतून आलेल्या लोकांना अत्तर, गुलाब देण्याची पद्धत आहे. अत्तर, गुलाब ( पाणी ) हे दोन्ही शब्द व पदार्थ ( वस्तु ) फारसी ( पर्शियन ) आहेत; अर्थात् त्यांचा संबंध मुसलमानांशी पोचतो हे निराळे सांगावयास नको. आमच्याकडे सुगंधी तेले होती, यासाठी तेल आणि अत्तर यांतील फरक लक्षात ठेवायला पाहिजे. अत्र ( अत्तर ) हे एक सुगंधी द्रव्य असा उल्लेख रामदासांच्या लेखनात सापडतो. रामदासांच्या बागाईत प्रकरणात कितीतरी सुगंधी फुलांची आणि वनस्पतींची नावे आढळतात. पण त्यामध्ये 'गुलाब' नाही. गुलाबच नाही तर गुलाबाचे पाणी नसावे हे सरळच आहे. अत्तर व गुलाब नव्हते तेव्हा सभा-समारंभात निमंत्रितांची संभावना कशी केली जात असेल हा प्रश्न उद्भवतो व त्याचे उत्तर चंदनाची पूड व सुवासिक फुले हे एकनाथांच्या ग्रंथात आहे. डोळ्यातील शक्ती वृद्धावस्थेमुळे खालावल्यास लेखन-वाचनानिमित्त लोक कोणता उपाय अमलात आणीत याचे उत्तर रामदासांनी 'चाळिशी' हा शब्द त्रिविध तापां-










पैकी एका तापाच्या वर्णनात वापरून दिलेले आहे. खाद्यात मिरचीचा प्रवेश रामदासांपर्यंत व त्यापुढे अनेक वर्षे झालेला नव्हता. मिरचीच्या अभावी मिरपूड वापरण्याचा प्रघात होता. मिरपूड सपाटून खाल्ल्यामुळे अतिशय पाणी पिऊन विचित्र अवस्था झालेल्या एका मनुष्याचे वर्णन दासबोधाच्या एका समासात आहे. 'मानसपूजा' प्रकरणात पदार्थ तिखट करावयाचा असेल तर मिरपूड, सुंठ, आले उपयोगात आणावे अशी माहिती आहे. मिरची ही वस्तू पोर्तुगीजांनी आणली; म्हणजे कोकण भागाला तिची प्रथम ओळख झाली. ही वस्तुस्थिति तुकोबांच्या चरित्रातील एका गोष्टीला खो देणारी आहे. घाटाखाली कोकणात देशावरून मिरच्या न्यावयाच्या आणि कोकणचे मीठ देशाला पुरवावयाचे हा व्यापाराचा प्रकार तुकोबांच्या वाणिज्यव्यवहारात होता अशी ती गोष्ट आहे. तुकोबांच्या काळी देशावर मिरचीच नसेल तर मिरची–मिठाच्या देवाणघेवाणीला अवकाशच रहात नाही आणि ही तुकोबांच्या चरित्रातील गोष्ट खोटी– कोणीतरी त्यांच्या पश्चात् मिरचीचे पीक निघू लागले तेव्हा बनविलेली–असे तात्पर्य स्वीकारावे लागते.

### फाणस व साबण

आतषबाजी, अत्तर गुलाब, मिरपूड, मिरची, यांच्याप्रमाणेच मेणबत्त्या, फाणस या प्रकाश पुरविणाऱ्या साधनांचा पत्ता रामदासांपर्यंत मराठी साहित्यामध्ये लागत नाही. रामदासांनी एका स्फुट प्रकरणात सूर्य, चंद्र, तारे, वीज इत्यादि आकाशस्थ प्रकाशसाधनांबरोबर लोकांच्या वापरातील दिव्यासारख्या साधनांची नोंद केली आहे. तिच्यात मोमबत्ती व फाणस यांची नावे दृष्टीस पडतात. भारतीयांना मेण माहीत नसेल असे म्हणवत नाही, पण त्याचा प्रकाश पुरविण्यासाठी उपयोग करण्याची युक्ति माहीत होती की नव्हती हा शंकेचा विषय आहे. मोमबत्ती हा शब्द रामदासांच्या वाङ्मयात पाहिल्यावर त्यांच्या काळी हे उजेडाचे साधन लोकांना माहीत होते, याबद्दल खात्री पटते. फाणस कसा असे याचा लोकांना रामदासांनी उलगडा केलेला नाही. तरी त्याचा उपयोग रामदासकाळी होऊ लागला होता, हे त्यांनी केलेल्या उल्लेखावरून निश्चित कळते. साबण हा शब्द तुकोबांच्या अभंगात व रामदासांच्या वाङ्मयात आढळतो. तो शब्द मूळ पोर्तुगीज शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे. साबण ही परदेशस्थांची देणगी असे सांगितल्यास कबूल करणे जड जाईल. तथापि ही पोर्तुगीजांचे देणे वाङ्मयात घातल्यास लोकांना त्याचा बोध होण्यास अडचण पडणार नाही, इतका तो अतिशय ओळखीचा होण्याला पोर्तुगाजांच्या राज्यस्थापनेनंतर निदान १२५ वर्षे लोटावी लागली. गेल्या ५०-७५ वर्षांच्या अनुभवानुसार सुरवातीस साबण कदाचित् निषिद्ध मानला गेला असेल. ६० वर्षांमागे टोमॅटो हे फळ रंगाने लाल (रक्तासारखे) आणि इंग्रजांनी आणलेले म्हणून 'विलायती वांगे' या नावाखाली निषिद्धात गणले गेले होते. चहाविषयी एकदा अशीच समजूत रूढ होती. याप्रमाणे साबण तयार करतांना पोर्तुगीज लोक जर गाई, डुकराची चरबी वापरीत असतील तर साबणाच्या रूपाने त्यांनी हिंदु, मुसलमान समाजाला बाटविण्याचा एक नवा कपटी उपाय काढल्याची शंका बळावून लोकांनी त्याकडे काही काळ लक्ष दिले नसल्यास आश्चर्य वाटायला नको. मुक्तेश्वर हा कवि शिवाजीमहाराजांच्याच काळातला. त्याने फिरंग्यांच्या नौकायुद्धाचा निर्देश आपल्या महाभारतात केलेला आहे. कौरवपांडव युद्धविद्येत निपुण झाल्यावर त्यांची परीक्षा भीष्मादिकांसमोर घेण्यात आली असा प्रसंग मूळ महाभारतात आहे. त्या प्रसंगाची कथा निवेदन करताना मुक्तेश्वराने फिरंग्यांच्या नौकायुद्धाला, त्याचप्रमाणे मराठ्यांच्या व कर्नाटक्यांच्या लढाईचा विशेष कोणता, यांनाही स्थान दिले आहे. कौरवपांडवांच्या युद्धविद्येची परीक्षा हस्तिनापुरास झाली, तेथे जवळपास समुद्र तर नाहीच पण नौकायुद्धाच्या प्रयोगाला पुरेसा एखादा प्रचंड जलाशयही नाही. मुक्तेश्वराला महाभारताची कथा सांगताना हस्तिनापुराची भौगोलिक स्थिति पाहण्याची आवश्यकता वाटली नाही; यामुळे त्याने अगदी सहजिकपणे, फिरंग्यांचे नौकायुद्ध कौरवपांडवांच्या युद्धविद्येत नमूद केले. लढण्याच्या कोणत्याही प्रकारची उणीव राहू नये, या हेतूने मराठ्यांची व कर्नाटक्यांची लढण्याची तऱ्हा सांगण्याची आवश्यकता मुक्तेश्वराला वाटली.

### खानपान–वस्त्रप्रावरण–अलंकार

सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात व सतराव्या शतकात महाराष्ट्रामध्ये लोक काय खातपीत असत, त्यांची

वस्त्रे प्रावरणे कोणती होती, अलंकार कोणते होते, याचे ज्ञान राजकीय उलथापालथीच्या इतिहासातून मिळत नाही. ते त्या शतकातील साहित्यालाच शरण गेल्याने लाभते. एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवरात, रामदासांच्या दासबोधात, मानसपूजेत, मुक्तेश्वरांच्या महाभारतात, कृष्णदयार्णवांच्या हरिवरदेत, खाद्यपेयांची, वस्त्रालंकारांची वर्णने आलेली आहेत. या वर्णनातील खाद्यपेये किंवा वस्त्रालंकार प्रामुख्याने ब्राह्मण समाजाच्या अनुरोधाने आलेली आहेत. कृष्ण व रुक्मिणी ही दोघे क्षत्रिय म्हणून मांसाहरी असली किंवा त्यांच्याकाळी ब्राह्मणातही मांसाहार रुढ होता, हे खरे असले तरी त्यांच्या खाण्यापिण्याची कपड्यालत्त्याची माहिती सांगणारे सोळाव्या-सतराव्या शतकातील महाराष्ट्राचे कवि ब्राह्मण होते, यामुळे त्यांची माहिती सामाजिक दृष्ट्या एकांगी ठरते; पण तिचे ऐतिहासिक महत्त्व नाकारता येणार नाही. ब्राह्मण का होईनात, पण त्यांचा आहार किती विविध स्वरूपाचा होता, याचे ज्ञान पुरविणारी ही भोजनवर्णने आहेत. आज त्यातली कित्येक खाद्ये लोकांच्या स्मरणात देखील उरलेली नाहीत, मग ती कोणत्या पदार्थांच्या साहाय्याने कशी तयार करीत असत या माहितीबद्दल बोलायलाच नको.

स्त्रिया एकाकाळी डोक्यापासून पायापर्यंत मढविलेल्या असत. डोक्यावरील ( नाक कान हे अवयव जमेस धरून ) दागिन्यांची संख्या दहापर्यंत जाणारी आहे. गळयात घालण्याच्या दागिन्यांचे प्रकारही असेच विपुल होते. नंतर दंड, मनगटे, हाताची बोटे यावर चढणारे दागिने. कंबरेचा बहुधा एकच अलंकार असावा. साखळ्या, तोरड्या, विरवल्या, जोडवी (पायाच्या बोटांचे अलंकार ) अशारीतीने सर्वांगावरील दागिन्यांची नावे जुन्या ग्रंथांतून पहायला सापडतात. त्या दागिन्यांची नावे ऐकून त्यांची रचना कशी होती हे बिनचूक सागणारी माणसे आज भेटत नाहीत. त्या दागिन्यांची कारागिरी विद्यमान व्यवहारात लोपली हे निराळे सांगायला नको. पण इतिहासकाळी अलंकार कोणते होते, हे सांगितल्याखेरीज तेव्हाच्या लोकांच्या जीवनाचा इतिहास पूर्ण होणार नाही.

दागिन्यांसारखीच स्त्रियांच्या वस्त्रांची स्थिति आहे. द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रसंग सांगताना पुष्कळशा कवींनी स्वकालीन लुगड्याचे प्रकार नमूद केलेले आहेत व त्यातल्या काही प्रकारांची नावे कोणत्या गांवी ती लुगडी विणली जात होती, याचीही कल्पना आणून देतात. ' पैठणी ' हा शब्द ' पैठण ' तीर्थाच्या शहरी जरीची उंची वस्त्रे निर्माण होत असल्याचा साक्षीदार असल्याचे सर्वांना ठाऊक आहे. या वस्त्रांत इरकली, महेश्वरी यासारखी नावे दृष्टीस पडतात. ही नावे आजमुद्धा परिचित आहेत. यावरुन ती किती जुन्या काळापासून चालू आहेत याचा अंदाज करता येतो. बाकीची वस्त्रे नामशेष झाली की निराळी नावे धारण करून आहेत याचा शोध करायला पाहिजे.

निरनिराळ्या व्यवसायातील लोकांची वागणूक कशी बिनसचोटीची होती, याची ओळख एकनाथांनी करून दिलेली आहे. सीतेचा शोध करीत मारुति लंकेच्या गल्याबोळांतून फिरत असता शिंपी, सोनार, कोष्टी वगैरेंच्या धंद्यांची तऱ्हा पाहिली व जेथे चोरीचे काम चालते तेथे सीता असणे शक्य नाही, असा सिद्धान्त स्वीकारून तो पुढे जातो. शिप्यांनी कापड, सोनारांनी चांदी-सोने लाटावे, कोष्टयांनी कमी मापाची वस्त्रे विणून गिऱ्हाइकांच्या गळयात बांधावी असला कारभार एकनाथांच्या काळी घडत होता. सुनांना सासवांनी छळावे, धाकट्या नणंदेने किंवा दीराने आपल्या घरात आलेल्या नव्या भावजयीने शिजत ठेवलेल्या अन्नात बारीक खडे टाकून तिच्या छळाची तयारी करावी. या गोष्टी रामदासांच्या दासबोधात आलेल्या आहेत. सुनेला छळण्याच्या तऱ्हांचाही उल्लेख त्यात पहायला सापडतो. रामदासांच्या निवेदनातील मूर्ख, टोणपा करंटा , अळशी , आधाशा , झोपाळ हा इतिहासकाळात नव्हे तर आजही समाजात आहे. लोक देवळाच्या दाराशी पादत्राणे ठेवून दर्शनाला गेले की त्यांची पादत्राणे चोरीस जातात, हा किंवा कीर्तनास जाऊन तेथे जमणाऱ्या बायकांकडे पाहाणे, हा रामदासांच्या काळांतील अनुभव आज येत नाही असे कोण म्हणू शकेल ? रामदासांनी दासबोधाच्या एका दशकाचे पाच समास माणसाच्या संपूर्ण प्रापंचिक जीवनयात्रेकडे खर्चिले आहेत. त्या समासांतून रंगविलेले चित्र तेव्हाच्या जीवनगतीची यथार्थ कल्पना आणून देणारे आहे. जन्मापासून मरेपर्यंतचा मानवी जीवनाचा तो वृत्तान्त








असून परचक्र, दुष्काळ, घरात सावत्र मुलांची भांडणे इत्यादि दुःखांचा बोध त्यायोगाने साधतो. दासबोधात माणसाच्या दिनचर्येचे दोन समास आहेत. त्यात सकाळपासून रात्रीपर्यंतच्या वर्तनाचा आढावा आहे. आजचे दैनिक वर्तन व तेव्हाचे दैनिक वर्तन यातील साम्यभेद पाहाण्याला त्या समासांचा उपयोग होता. दोन्ही समासात तपशीलाचाही फरक आहे.

इतिहासकालीन महाराष्ट्रात कोणते ज्ञानाचे विषय लोकपरिचित होते याचा कयास ज्ञानेश्वरांच्या अज्ञान-निरूपणावरून बांधता येतो. एकनाथ व रामदास यांनी अध्ययनोचित विषयांना आपल्या ग्रंथांतून स्थान दिलेले आहे. गीता, भारत, भागवत, योगवासिष्ठ यावरील मराठी टीका कोणते ग्रंथ तेव्हा लोकांच्या आवडीचे होते, याबद्दल ग्वाही देतात. परंतु बरेच लेखक आपल्या प्रतिपादनाला पुष्टि मिळावी म्हणून जी संमतिवचने स्वीकारतात त्यांचा अभ्यास केला तर परमार्थाच्या साधनाकरिता कोणत्या संस्कृत ग्रंथांची व त्यातील कोणत्या ठरावीक वचनांची कास धरली जात असे, याचा निश्चय करता येतो. आणखी एक विशेष या संबंधात सांगायला पाहिजे. शिवलीलामृतासारख्या भक्तीला विचित्रपणे उठाव देणाऱ्या कथा लिहिल्या जाण्याचा एक विशिष्ट कालखंड आहे. कथाकल्पतरु-कार गुरुशिष्य रामदास बंधूश्रेष्ठ यांचे ग्रंथ, रामदासांचे शिष्य दिनकर अशा लेखकांनी शिवलीलामृतातल्या-सारख्या गोष्टींचा आदर केला आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास यांच्यासारख्या पुरुषांनी तत्त्व-ज्ञानाचे विचार भक्तीच्या पाठीशी उभे केले असता त्यांच्या काही समकालीनांनी भाबड्या कथांचा का अवलंब करावा हे महाराष्ट्राच्या बौद्धिक इतिहासाचे कोडे आहे व ते अभ्यासण्याची आवश्यकता आहे. देवाचे नाव कोणत्याही निमित्ताने उच्चारले गेले किंवा देवावर भक्तिशिवाय पाणी, पाने, फुले एखाद्याच्या हातून पडली की देव प्रसन्न होतो व अशा भक्ति-हीनांचे मनोरथ पुरवितो, या गोष्टी भक्तीचा विपर्यास करणाऱ्या असूनही त्यांचे माहात्म्य एकदा महाराष्ट्रात वाढले होते. या स्थितीचा अंतर्भाव महाराष्ट्राच्या ज्ञानोत्तरकालीन जीवनाच्या इतिहासात येणे अपरिहार्य आहे. साहित्यातून आलेला इतिहास वगळून इति-हासाची खरी सांगता व्हावयाची नाही व तो इति-हास साहित्यात कुठे कसा सापडतो या प्रश्नाचे येथे किंचित् दिग्दर्शन केलेले आहे.

---










प्रा. पंडित आवळीकर

# तुकारामबोवांवरील एक निबंध

'सत्यअसत्यासी मन केले ग्वाही ।
मानियले नाही बहुमता '

तुकारामबोवांसंबंधी विपुल लेखन झालेले आहे. प्रस्तुत निबंध हा तुकारामबोवांवरील निबंधावर लिहिलेला–त्या निबंधाचा परिचय करून देणारा– आहे. मूळ निबंधाचे लेखक कै. बाबाचार्य दादाचार्य आद्य (जहागीरदार) हे होत. आद्य किंवा जहागीर यांचे घराणे कर्नाटकातील प्रसिद्ध व विद्वान वैष्णवांचे घराणे मानले जाते. त्यांचे मूळ गाव विजापूर जिल्ह्यातील (तालुका इंडी) भीमातीरावरील अगरखेड होय.

कै. बाबाचार्य जहागीरदार यांचे बहुतेक सर्व आयुष्य अगरखेड येथेच गेले. पण अध्ययनाच्या व अध्यापनाच्या निमित्ताने पुण्यात काही काळ त्यांचे वास्तव्य झाले. न्याय, वेदान्त व्याकरण, काव्य यात ते नुसतेच निपुण नव्हते तर या विषयांवरील ते एक अधिकारी विद्वान् होते. पुण्यात असताना शिवरामपंत परांजपे व लो. टिळक यांच्याशी त्यांचा घनिष्ट परिचय होता असे सांगितले जाते. 'गीतारहस्या'संबंधी टिळक व जहागीरदार यांच्यात खंडनमंडनपर वादही झाला होता.

जहागीरदारांनी आपले आयुष्य अध्ययन-अध्यापनालाच जणू वाहिले होते. विविध विषयांवर थोडेच पण अत्यंत मोलाचे लेखन त्यांनी मराठीत केले आहे. त्यांपैकी वानगीदाखल एक निबंध येथे परिचयासाठी निवडला आहे.

जहागीरदारांचा निश्चित जन्मशक उपलब्ध नाही. ते स. १९२८ मध्ये वारले त्यावेळी ६१–६२ वर्षांचे होते. म्हणजे स. १८६६–६७ मध्ये त्यांचा जन्म झाला असावा. जुने ज्ञान व नवी दृष्टि यांचा दुर्मिळ संगम त्यांच्यात झाला होता. अशा व्यासंगी विद्वानाच्या मराठी लेखनाचा परिचय करून देण्याची संधि दिल्याबद्दल व आपल्या थोर वडिलांबद्दलची माहिती व त्यांची हस्तलिखिते उपलब्ध करून दिल्याबद्दल मी श्री. म. बा. जहागीरदार यांचा आभारी आहे.

## एका अभंगावरील टीका

तुकारामबोवांवरील हा निबंध म्हणजे बोवांच्या एका अभंगावरील तर्कशुद्ध व शास्त्रीमंडळींच्या पद्धतीने केलेले सुंदर निरूपण आहे. "सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियलें नाहीं बहुमता" या अभंगावरील ही टीका आहे.

निबंधाला लहानशी प्रस्तावना जोडलेली असून तिचे अर्धे पान फाटून गेले आहे. प्रथम अभंग उद्धृत करून "कोणत्या कालाला कोणत्या प्रसंगाला अनुलक्षून वरील अभंग उच्चारला असावा आणि त्यामध्ये त्यांचा विशिष्ट हेतु कोणता होता, वगैरे गोष्टींबद्दल यथाशक्ति विचार करण्याचे मी योजिले आहे;" असा निबंधलेखनामागील आपला उद्देश जहागीरदारांनी स्पष्ट केला आहे.

हा निबंध केव्हा लिहून झाला याचा उल्लेख कोठे आढळत नसला तरी १८–९–१८९९ नंतर त्याचे लेखन झाले असा निर्णायक पुरावा आढळतो. या निबंधाची प्रेरणा 'सुधारक'कारांकडून मिळाली व त्यांच्याच सूचनेप्रमाणे विषयांतर टाळले आहे; असेही लेखक म्हणतात.[1]

## प्रस्तुत अभंग हे एक सूत्र

विवेचनासाठी निवडलेला अभंग हे एक बावीस[2] अक्षरांचे सूत्र असून सूत्राचे लक्षण त्याला लागू पडते असा विचार निबंधाच्या प्रारंभी जहागीरदारांनी मांडला आहे.

अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतो मुखम् ।
अस्तोममनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ।।

---

१. "ता. १८–९–९९ च्या सुधारकपत्रात लिहिल्याप्रमाणे सदरहू विषयाखेरीज विषयांतर न होण्याविषयी खबरदारी घेतली आहे. सुधारककारांनी सुचवलेला हा निबंध अ (त्यंत ?) महत्त्वाचा असून तो लिहिणाऱ्याच्या सदनुभवाने चां (गला ?) पटल्यास लोकात फार उपयोगी होईल. ... ..."

२. 'बेवीस' असा शब्द जहागीरदार वापरतात.



अनुक्रमणिका






असे शास्त्रकार सूत्राचे लक्षण सांगतात.

जहागीरदार म्हणतातः- " शास्त्रकारांनी सूत्राचे लक्षण घेतले आहे, ते वरील अभंगाला देखील लागू पडत आहे. सूत्राच्या लक्षणवाक्यातील प्रत्येक पदाचा अर्थ बोवांच्या अभंगात येत आहे. ते असे की वरील अभंग हा अल्पाक्षरी असून असंदिग्ध आहे ( म्हणजे त्याचा कोणता अर्थ घ्यावा असा संशय येत नाही ) आणि सारवत् म्हणजे रसभरित असून विश्वतोमुखी आहे ( अनेक प्रसंगी व अनेक प्रकारच्या व्यवहारात त्याचा अनुभव येत आहे ) आणि अस्तोम म्हणजे त्यात कोणतेही अक्षर व्यर्थ नाही असे असून अनवद्य म्हणजे पददोष, वाक्यदोष व व्याकरणदोष वगैरे दोषांपैकी ऐकही दोष नाही. "

बोवांच्या एकाच अभंगाचा नव्हे तर " यासारखे दुसऱ्या अभंगाचे देखील स्थळोस्थळी विचार होत असावे " अशी सूचनाच जहागीरदार करून थांबत नाहीत तर बोवांच्या वाणीलाच सूत्र असे नवे ( आणि अन्वर्थक ) नाव देतात. सूत्राकडे पाहण्याची त्यांची वेगळी दृष्टि आहे. सूत्राच्या आधारे अनेक गोष्टी स्पष्ट होतात; मतनिर्णय होऊ शकतो व ग्रंथकोटींनी सांगण्यासारखे सूत्रासारख्या श्लोकार्धात सांगितले जाते : म्हणजेच एखाद्या सूत्रावर त्याच्या स्पष्टीकरणासाठी ग्रंथ देखील लिहिता येतो असे जहागीदारांना वाटते. बोवांच्या वाणीला सूत्राची योग्यता आहे असे म्हणून त्यांनी बोवांचा मोठा यथार्थ गौरव केला आहे यात शंका नाही.

## बोवांची स्वतंत्र विचारशक्ति

बोवांच्या अभंगाचा अर्थ करताना प्रथम एक गोष्ट जहागीरदारांना जाणवते आणि ती म्हणजे बोवांची स्वतंत्र विचारशक्ति. जगात अनेक प्रकारची मते प्रचलित असतात. पण मनुष्य सामान्यतः " पूर्वजांचा धर्म, पूर्वजांचा आचार आणि पूर्वजांचीच विद्या मुख्यत्वेकरून यांच्याच नादी लागतो. त्यामुळे पुष्कळदा ' अन्यमतासहिष्णुता ' त्याच्या अंगी जडते. ही जगाची सर्वत्र आढळणारी रीत आहे. तुकाराम बोवांनीही मतामतांचा गलबला पाहिला व शेवटी आपल्या मनाची साक्ष काढली यात बोवांची स्वतंत्र विचारशक्ति दिसते हे जहागीरदारांचे म्हणणे योग्य असेच आहे.

परंतु आपल्या या म्हणण्यावर आक्षेप घेणे शक्य आहे याची जाणीव असल्याने जहागीरदार लिहितात " आता वरील विवेचनावर एक आक्षेप येतो, तो असाः– तुकारामाने जेव्हा सर्व मते झुगारून दिली, तेव्हा त्याचे मत काय होते ? ईश्वर, काल, कर्म वगैरे गोष्टींविषयी त्याचे विचार कसे होते ? जीव आणि परमात्मा यांचा भेद सत्य आहे असा त्यांचा ग्रह झाला असेल तर तो द्वैत मतात शिरला आणि वरील भेद असत्य आहे असे जर त्याने जाणले असते तर तो अद्वैत मताचा झाला. याहून अन्य मतांपैकी कोणत्याही मताशी जर त्याचे विचार जुळले तर त्या मताचा तो बनला. एकूण कोणतीही कल्पना घेतली तरी एखादे मत स्वीकारिले तेव्हा " मानियले नाही बहुमता " याचे वरील प्रकारचे आमचे विवेचन कसे जुळते, असा आक्षेप येत नाही काय ?

आपणच उपस्थित केलेल्या आक्षेपाचे निरसन पुढे जहागीरदार करतात. आपण केलेला अभंगाचा अर्थ "व्याकरणाच्या नियमाला अनुसरून असून सर्व विद्वानांच्या मनात एकदम भरण्या ( ठसण्या ) सारखा आहे, " याची त्यांना खात्री आहे. त्यामुळे ओढाताण करून दुसरा अर्थ काढण्याच्या खटपटीला ते लागत नाहीत.

बोवांनी काढलेली ' मनाची साक्ष ' या आक्षेपाला उत्तर देऊ शकेल असे जहागीरदारांना वाटते. ते ' अर्थान्तरन्यासमुखाने लौकिक उदाहरण ' देऊन हा आक्षेप खोडण्याचा प्रयत्न करतात. ते म्हणतात :– " **अ** ला **ब** ने सांगितले की माझ्या घरी उंदीर आणि मांजर हे दोनही मोठ्या प्रेमाने वागतात. आणि **क** ने सांगितले माझ्या येथे ते दोनही एकमेकांशी मोठ्या द्वेषाने वागतात. आता या परस्परविरुद्ध गोष्टींपैकी अमुक एक गोष्ट खरी म्हणावयाला **अ** ला आपल्या मनाला व अनुभवाला एका बाजूस ठेऊन येईल काय ? ज्यावेळी उंदीरमांजरांचा विरोध (आपण पूर्वी अनुभवलेला) याची कल्पना मनात येईल तेव्हाच वरील वादाचा निकाल होणार व या निकालात मनाचीच साक्ष विश्वसनीय होणार. जर **अ** ला उंदीरमांजराचा स्वाभाविक विरोध कधीच माहीत नसता तर या वादाचा निकाल झाला असता काय ? **ब** आणि **क** या दोघांचे वाक्यां-








पैकी क चे वाक्यच जरी येथे प्रमाण झाले तरी ते स्वतःमान्य झाले नाही. " कोणतेही मत ' स्वतः-मान्य ' होणे हे महत्त्वाचे. बोवांच्या अभंगात याच गोष्टीवर भर दिलेला आहे.

### व्याकरणदृष्ट्या विचार

यानंतर प्रस्तुत अभंगाचा दुसऱ्या दृष्टीने विचार करीत असलेले जहागीरदार दिसतात– " मानियले नाही बहुमता " या भागाचा व्याकरणाच्या साहाय्याने त्यांनी अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. ' मानियले ' हा कर्मणिप्रयोग न मानता भावेप्रयोग असे गृहीत धरावे व ' मानणे ' या क्रियेचा ' कवि ' हा कर्ता न घेता ' मनाला साक्षीकरण ' हा कर्ता मानावा आणि ' बहुमता ' हे कर्मकारक न समजता संप्रदानकारक समजावे, अशी जहागीरदारांची विचारसरणी आहे. यामुळे ' मानियले नाही बहुमता ' या भागाचा अर्थ अमुक एक गोष्ट सत्य किंवा असत्य याविषयी फक्त मी माझ्या मनालाच साक्ष केले आहे. पण ते अनेक प्रकारच्या मतांच्या लोकांना पटले नाही; " असा होईल.

तुकारामबोवांनी आपले ' सत्य व सानुभव ' मत तत्कालीन लोकांना सांगितले (हे मत कोणते याची चर्चा करीत जहागीरदार बसत नाहीत) पण ते लोकांना पटले नाही; असे म्हणून त्यांचे आजही जर भक्त आढळतात तर त्याच्याकाळी कोणी नव्हते असे कसे म्हणावयाचे व त्याचे मत लोकांना पटले नाही हा अर्थही कसा पतकरावयाचा, असा आणखी एक आक्षेप जहागीरदार घेतात.

यालाही जहागीरदारांजवळ उत्तर आहेच. बोवांच्या काळी जे भक्त त्यांना लाभले असतील ते ' भोळे, ' अनभिज्ञ असण्याची शक्यताही डोळयाआड करून चालणार नाही. त्यांना मत पटले तरी तत्कालीन विद्वानांना ते पटले नाही असा अर्थ घ्यावा असे जहागीरदार सुचवितात. ' बहुमता ' या शब्दाचा अर्थ ' बहुजनांचे मत ' असा न घेता ' तत्कालीन बहुतेक विद्वानांचे मत ' असा घ्यावा : या लोकांची संमति न मिळाल्याने एक प्रकारची " निराशा उत्पन्न होऊन सहज त्यांचे तोंडातून असा उद्गार निघाला असावा " अशी कल्पना जहागीरदार मांडतात.

' केले ' व ' मानियले ' या क्रियांच्या कर्तृवाचकपदाचा स्पष्ट उल्लेख नाही हीही गोष्ट त्यांना महत्त्वाची वाटते. या क्रियापदांचा कर्ता प्रथमपुरुषी व तृतीयपुरुषी मानणे शक्य आहे. तृतीयपुरुषी कर्ता मानण्यास (माझ्या प्रमाणेच ) ( काही ) इतरेजनांनीही आपल्या मनाला साक्ष 'केले' व बहुमताला 'मानियले' नाही–असा अर्थ घेता येईल. " आपण ज्या अनुभवाने व जसी दुसऱ्यांची मते सोडून दिली, तसे आपले मत लोकतरी कशास मानतील ? एवढे तुकोबा समजून होता; " अशी पुस्ती जहागीरदार जोडतात.

तेव्हा बोवांच्या प्रस्तुत " अभंगातून " हंसक्षीरन्यायाने सर्व मतांतील चांगले तेवढे घेऊन तुमच्या बुद्धीनेच खऱ्या खोट्याचा विचार करा " असे ' तात्पर्य ' काढण्यास हरकत नसावी; असे जहागीरदारांना वाटते.

परंतु सर्व मतांचे आकलन होणे शक्य आहे काय ? तुकारामबोवांनी तरी त्यांच्या काळच्या सर्व मतांचे ( तत्त्वज्ञानांचे ) सखोल अध्ययन केले होते काय ? प्रत्येक मताचा ' पूर्वापर भाव ' त्यांनी चांगला समजून घेतला होता काय ? हेही प्रश्न मनात येतात व त्यांची नकारार्थी उत्तरे द्यावी लागतात. त्यामुळेच हीही शंका उपस्थित होते की, मग बोवांनी ' मानियले नाही बहुमता ' असे कसें म्हटले ? सर्व मतांचे अंतःस्वरूप कळल्याशिवाय त्यांचा निषेध कसा करता येईल ? ' या शंकेचे निवारण असे करता येईल की एखाद्या गोष्टीचा निषेध करावयाला आधी तिचे अंतःस्वरूप सवाशी समजलेले असावे. असा नियम कधीही करता यावयाचा नाही ', सामान्य ज्ञानाच्या आधारेसुद्धा एखाद्या गोष्टीचा निषेध करता येईल : अशी जहागीरदारांची भूमिका आहे. ' रात्री दही खाऊं नये ' असा निषेध वैद्यकशास्त्राचे ज्ञान नसताना दह्याचे अंतःस्वरूप ( वैद्यकशास्त्रदृष्ट्या ) न जाणताही करता येतो; असा सिद्धान्त ते मांडतात. ( या सिद्धान्ताबाबत चर्चा करावयाचे काही कारण नाही ).

सर्व मतांचा निषेध करणाऱ्या तुकाराम बोवांचे स्वतःचे असे कोणते मत होते ? बोवा द्वैती होते की अद्वैती होते ? की बोवांच्या मनाने एखादा निर्णय घेतला नव्हता ? बोवा कोणत्या मताचे होते याचा पत्ता










लागत नाही असे जहागीरदारांचे मत आहे. " माझा स्वामी विठ्ठल आहे त्याची सेवा मी करावी. जीवेश्वरांचे ऐक्य खरे किंवा खोटे, याचप्रमाणे हा प्रपंच सत्य किंवा असत्य यांतील एकाचाही खरेपणा अद्यापि मी जाणिला नाही, आणि हे विचार करण्याचे काम मी माझ्या मते मनालाच सोपवून दिले आहे. पण मनाला जे वाटेल ते वाटो. अशा गहन विषयाचा निकाल एकाएकी होणार नाही, " असे बोवांना वाटत असले पाहिजे व त्यांचे हे मनोगत– किंवा मत– प्रस्तुत अभंगातून व्यक्त झाले आहे. बोवांच्या मनाने मतनिर्णय केला असता तर, आपले मत त्यांनी ठासून मांडले असते, हे जहागीरदारांचे म्हणणे खरोखर चिंत्य आहे.

### मनासंबंधी काही विचार

बोवांनी ज्या मनाच्या साक्षीला एवढे महत्त्व दिले त्या मनाचे स्वरूप व सामर्थ्य यांचा थोडाबहुत विचार करावा असे जहागीरदारांना वाटते. मानवी मनात साम्य व भेद दोन्हीही असतात असे म्हणून मन हे बीजा सारखे असते अशी कल्पना ते मांडतात. बीजाला जमीन, पाणी व पेरणारा मिळाल्याखेरीज त्याला अंकूर फुटत नाही. तसेच मनालाही जगातील व्यवहारांशी संबंध आल्याखेरीज विचारशक्तीचा अंकूर फुटत नाही. मन, स्वभाव व विचारशक्ती यांचे वैचित्र्य जगात आढळते.

वास्तविक मन म्हणजे तरी काय ? मन म्हणजे लिंगदेहाचा एक अवयव. ज्ञानशक्तीचा वास तेथेच असतो. म्हणूनच ज्ञानाला मनोवृत्तीज्ञान म्हटले पाहिजे. मनोवृत्तीज्ञानानेच ईश्वराची चांगली उपासना करता येते. यामुळेच " सत्यासत्यतेचा विचार करण्याचे कामी आपल्या मनालाच साक्ष धरणे " हे जहागीरदारांना " प्रशस्त वाटते. "

### तीन प्रकारचे लोक

दृश्य प्रपंचाचा विचार करताना आपल्या मनाला साक्ष धरणाऱ्या लोकांचा एक वर्ग असतो. यातच तुकोबांचा समावेश होईल. स्वतः विचार करण्याची धडपड न करता गुरुकडे जाणाऱ्यांचा दुसरा वर्ग. तिसऱ्या वर्गातील लोक पुष्कळ श्रम घेऊन शेवटी मतामतांचा मेळ न बसल्याने अखेर गुरुकडे धाव घेतात. यापैकी कोणत्या वर्गातील लोक श्रेष्ठ हा प्रश्न उपस्थित करूनही त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न जहागीरदार करीत नाहीत. कारण त्यांना विषयान्तराची भीति वाटते म्हणून आजच्या काळातही कोणत्या वर्गाचे लोक जास्त आहेत या विचाराकडे ते वळतात.

दुसरा वर्ग हा परावलंबी – खरे म्हणजे गुरूवर अवलंबून राहणाऱ्या लोकांचा. ही माणसे चहूकडे दिसतात. त्यांना हा अभंग रुचणार नाही व 'मन' या पदाऐवजी 'गुरु' हे पद तेथे असते तर त्यांना तो पटला असता; हे जहागीरदारांचे निरीक्षण बरोबर आहे. तिसऱ्या वर्गाच्याही बाबत हेच. पण पहिल्या वर्गाचे लोक जगात फारच थोडे असतात. (येथे उदाहरणासाठी न्या. मू. रानडे व स्पेन्सरसाहेब यांची नावे जहागीरदार देतात.)

### बोवा व सुधारकपंथ

तुकारामबोवा हे स्वतंत्रबुद्धीचे होते व धर्मभोळेपणाला त्यांचा विरोध होता; धर्माच्या नावाखाली अधर्म करणाऱ्या धर्माभिमानी (!) लोकांचा बोवांना तिटकारा होता. म्हणूनच बोवांनी " जित्या पित्या न मिळे अन्न । मेल्यावरी पिंडदान " किंवा " आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ॥ जे बोडिले ते निघाले । सांग काय पालटले ? ॥ " अशा उक्तीवरून जहागीरदारांना म्हणावेसे वाटतेः– " वास्तवीक रीतीने विचार केला असता तुकोबांची विचारसरणी हल्लीच्या सुधारक पंथाशी बहुतेकांशी जुळण्यासारखी आहे. "

हे मत धर्माभिमान्यांना संताप आणण्यासारखे आहे याची जाणीव असली तरी " वस्तुस्थिति टाकता येत नाही. " आपल्या या साहसावर विद्वान् धर्माभिमानी काय म्हणतील याचीही जहागीरदारांना अगाऊ कल्पना आहे. ते लोक म्हणतील; " अहो, आमच्या मंडळीत धर्म, कर्म व आचरण वगैरे संबंधाने चुकणारे लोक असतीलच. त्यांना आम्ही शहाणे म्हणत नाही. परंतु धर्मभ्रष्ट सुधारकांचा उपदेश सर्वथा आम्हाला नको. "

यावर जहागीरदारांनी दिलेले उत्तर मुळातून पाहण्यासारखे आहे. ते म्हणतात; ज्या वेडगळ धर्मसमजुतीमुळे सर्वथा समाजाची हानि आहे त्या कोत्या समजुतीला समूळ नाश करण्याकरिता झटणाऱ्या लोकांस धर्मभ्रष्ट व कर्मचांडाल वगैरे असंबद्ध विशेषणे देऊन त्यांचा

छळ करिता आणि तुमच्या मंडळीत दुराचारी लोकांना "आम्ही शहाणे म्हणत नाही" असेही म्हणता. विचार करून पाहा यामध्ये काहीतरी मेळ बसतो काय ? आता समाजात माजलेल्या धर्मवेडेपणासारख्या हत्तीला पाताळास पोहचविण्याच्या कामी सुधारकांची पावले जरा जास्त पुढे घसरतील ही गोष्ट खरी आहे. तरी 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायाने तुमच्या या प्रचलित वेड्या धर्मसमजुतीत जोपर्यंत तुमचा कानाडोळा असतो तोपर्यंत निदान व्यवहारात तरी चांगला वाटणारा सुधारक पक्षाचा लोक आश्रय करतील ही गोष्ट पक्की ध्यानात ठेवण्यासारखी आहे असे समजा. पुनर्विवाह वगैरे विषय सध्या तुम्हाला कटु वाटले तरी प्रथम-विवाह वगैरे कामात तरी काही प्रसंगी किती तुमच्या चुक्या आहेत त्या पाहा. बुद्धिपूर्वक एखाद्या लहान मुलीला मृत्युमुखी जरठास देऊन सर्वतोपरी त्या मुलीच्या जन्माची मातेरी करणाऱ्या नरपशूस तुमच्याकडून अगर तुमच्या धर्मगुरूकडून हल्ली काहीतरी शिक्षा आहे काय ? उलट त्याच्या येथे जाऊन पोळी खाण्यात, दक्षिणा उपटण्यात तुम्ही मागेपुढे पाहात नाही. याच-प्रमाणे आपल्या मुलाला काहीएक शिक्षण न देता समाजाला व्यर्थ भार झालेल्या त्या लठ्ठंभारती पोराच्या बापावर तुमचा अगर तुमच्या धर्मगुरूचा काहीतरी दाब आहे काय ?" या उताऱ्यात व्यक्त झालेली कळकळ, स्पष्टवक्तेपणा व पुरोगामी दृष्टि विलक्षण प्रभावी आहे.

सत्यासत्यतेप्रमाणेच खरा सुखाचा मार्ग कोणता व दुःखाचा कोणता याचाही निर्णय 'प्रचलित अज्ञरूढि किंवा अंधपरंपरान्याय' यांच्यामुळे होत नाही. म्हणूनच प्रथम किंचित् सुख व परिणामी मोठे दुःख व प्रथम किंचित् दुःख व परिणामी मोठे सुख-म्हणजेच 'दुर्विषय' व 'सद्विषय'-यांच्यात देखील माणसांना निवड करता येत नाही. "अशी सुखदुःखाची किंवा सत्यासत्यतेची निवडानिवड न होता गाढवासारखे कसेही चार दिवस ह्या जगात काढून प्राणास मुकलेले व मुकणारे थोडे लोक होते व आहेत असे नाही. तर नेहमी हे लोक असावयाचे" हा सार्वकालिक सिद्धान्त जहागीरदार मांडतात. ( स्पेन्सर-साहेबांना मूर्ख लोक नामशेष होतील असे वाटत असल्याचाही उल्लेख ते करतात ). अभंगाच्या फलितार्थाचा अनादर केल्याने उद्भवणाऱ्या संकटाचा निर्देश करण्यासाठी ही चर्चा त्यांनी केली आहे.

## आंतरिक अर्थासंबंधीचे आणखी काही प्रश्न

एवढे विवेचन केल्यावर जहागीरदार आपण सांगितलेल्या अभंगाच्या आंतरिक अर्थासंबंधी उपस्थित होणाऱ्या आणखी काही प्रश्नांचा विचार करतात. गुरूची वाट धरणे किंवा हा उपदेशमार्ग प्राचीन कालापासून चालत आला आहे तो नामशेष व्हावा अशी अपेक्षा करणे इष्ट आहे काय ? तसे होणे शक्य आहे काय ?

विचारशक्ती ही देशकाल, अवस्था, अनुभव यांच्याशी निगडित आहे. व्यक्तिगणित ती निरनिराळी असते हेही खरेच. तसेच तिच्यात तारतम्य किंवा नीचोच्चभावही असणारच. स्वावलंब व परावलंब यांचे गुणावगुणही कोटिक्रमाने सांगणे शक्य आहे. पण तसे न करता उभय पक्षातील सत्यांश स्वीकारावा. परावलंब व स्वावलंब यांचा प्रसंग पाहून व त्यातही समाजाचे हित डोळ्यापुढे ठेवून स्वीकार वा त्याग केला पाहिजे. आपल्यापेक्षा बुद्धीने व अनुभवाने श्रेष्ठ असलेल्या माणसाचा शोध करावा. तो मिळण्यास व त्याचे आपले मतैक्य झाल्यास त्याला गुरू करावा. असा गुरू न भेटल्यास व बहुमतांपैकी कोणतेही आपणास न पटल्यास मनाला साक्ष करावे.

मनाचे साक्षीकरण हे सापेक्ष आहे. म्हणजे जे मनःपूत वाटेल ते आणखी स्पष्ट करणारा गुरु भेटेपर्यंत ते खरे आहे. परावलंब व स्वावलंब हे उभय मार्गही काही अंशी खरे आहेत-सापेक्ष आहेत. बोवांना आपले समाधान करणारा गुरु भेटला नसावा म्हणून त्यांनी "सत्य असत्यासी मन केले ग्वाही। मानियले नाही बहुमाता" असे म्हटले. या विचाराबरोबरच निबंध संपविला आहे.

## प्रस्तुत निबंधाचे काही विशेष

कर्नाटकातील एका माध्वसंप्रदायी व प्रसिद्ध आचार्यघराण्यातील एका विद्वद्वर्याचा, सुमारे ६०-६२ वर्षांपूर्वी लिहिलेला निबंध असे प्रस्तुत निबंधाचे वर्णन केले की त्यात त्याचे महत्त्वाचे विशेष येतातच.








तुकोबासारख्या मराठी संत कवीचा इतक्या आस्थेने त्याकाळी या बाजूस विचार होत होता.

जाहागीरदारांचे पुण्यातही बरेच वास्तव्य झाले. त्यामुळेही तुकोबांच्या अभंगाकडे त्यांचे लक्ष वळले असावे. लो० टिळकांशी त्यांचा नुसताच परिचय होता असे नव्हे, तर त्यांच्या गीतारहस्यासंबंधी जहागीरदारांनी विचार केला होता: लेखांच्या स्वरूपात मांडलाही होता.

प्रस्तुत निबंधाच्या प्रस्तावनेत केलेल्या 'सुधारका'च्या उल्लेखावरून आगरकरांकडे त्यांच्या मनाचा ओढा अधिक वाहत असावा : कदाचित आगरकर व जाहगीरदार यांचा परिचय असावा असे वाटु लागते: न्या०-मू० रानडे व स्पेन्सर यांचाही निर्देश त्यांनी केला आहे. त्यावरून या दोघांच्या विचारसरणीबद्दल्ही काहीशी आत्मीयता– विशेषत: रानड्यांविषयी मोठा आदर– त्यांना वाटत असण्याची शक्यता आहे. जाहगीरदारांचा अभ्यास जुन्या शास्त्री-पद्धतीने झाला होता. इंग्रजीशी त्यांचा विशेष संबंध आला असेल– निदान स्पेन्सरचे ग्रंथ वाचण्याइतपत– असे वाटत नाही. पण मूळ ग्रंथ न वाचताही स्पेन्सरच्या विचारांची माहिती त्यांनी करून घेतली होती असे म्हणता येईल.

या निबंधात जाहगीरदारांचे व्यक्तित्व काही प्रमाणात उतरले आहे. विवेचनपद्धतीत त्यांच्यांतील संस्कृत पंडित दिसतो. पण हा संस्कृत पंडित धर्माचा वा रूढींचा अंधभक्त नाही. आपल्या संप्रदायाविषयीही जहागीदारांना अतिरेकी प्रेम नाही. तसे असते तर त्यांनी तुकोबांना 'द्वैवी' ठरविण्याचा आटोकाट प्रयत्न केला असता. त्यांनी हा प्रयत्न केला नाही यात मला त्यांची वेगळीच थोरवी दिसते. संस्कृत पंडितात क्वचित आढळणारी कठोर अशी पुरोगामी दृष्टि त्यांच्या जवळ होती. ती धर्माच्या नावाने अधर्म करणाऱ्यांवर टीका करताना प्रकट झाली आहे. तेथे एखाद्या प्रामाणिक सुधारकाचा अभिनिवेश व कळकळही पाहावयास मिळते.

भाषेच्याही दृष्टीने प्रस्तुत निबंधातील काही ठिकाणे पाहण्यासारखी आहेत. 'बुवा' ऐवजी 'बोवा' असा शब्द जहागीरदार वापरतात. अर्थ मनांत 'भरण्यासारखा' आहे असे लिहून पुन्हा ते 'ठसण्यासारखा' ही दुरुस्ती करतात. 'कधी' 'म्हणजे' हे शब्द ते 'कधीं', 'ह्मणजे' अशा प्रकारे लिहितात. त्याणे ( त्याने ), धरिला ( धरला ) अशी जुनी रूपे आढळतात. 'साहस' हा शब्द पुल्लिंगी वापरला गेला आहे. 'मार्ग धरण्याला प्रयत्न' ( 'धरण्याचा' नव्हे ) असाही शब्दप्रयोग मिळतो. भाषेचे वळण पाहता ते जुने आहे हे लक्षात यावे म्हणून काही उदाहरणे दिली आहेत.

जहागिरदारांनी एका अभंगावरील चर्चेच्या रूपाने तुकोबांच्या अन्य अभंगांच्या अभ्यासाची एक दिशा दाखविली आहे –या दृष्टिनेही हा निबंध महत्त्वाचा वाटेल. या निबंधात एकप्रकारचा विलक्षण जिवंतपणा आहे: तो त्यांच्या आगळया रूपामुळे आला आहे. प्रस्तुत निबंध हा जहागीरदारांनी केलेला आपल्या 'मनासी संवाद' आहे: 'आपुलाचि वाद आपणासी' असे त्याचे स्वरूप आहे. त्यामुळे बोवांच्या एका सूत्रावरील हे नुसतेच निरूपण नव्हे तर दुसऱ्या एका सूत्राचे[1] सुंदर उदाहरण आहे.

---

१. तुका ह्मणे होय मनासी संवाद । आपुलाची वाद आपणासी ॥








रवीन्द्रनाथ ठाकुर अनु०श्री. दुर्गा भागवत

# लोकसाहित्य

## बाळगाणी

बंगाली भाषेत मुलांना जोजवण्यासाठी जी स्त्री-गीते प्रचलित आहेत, त्यांचा संग्रह करण्यात मी कित्येक दिवस गुंतलो होतो. आमच्या भाषेच्या व समाजाच्या इतिहासाच्या निर्णयाच्या बाबतीत या गाण्यांचे विशेष मूल्य असेलही; परंतु त्यांच्यात जो एक स्वाभाविक काव्यरस आहे, तो मला अधिक आकर्षक वाटतो.

मला काय आवडते नि काय आवडत नाही असे सांगून समालोचनेची प्रस्तावना करताना मला भय वाटते; कारण जे निपुण समालोचक आहेत, ते अशा कृतीला आत्मप्रौढी असे मानून दोषी ठरवितील. त्यांना मला नम्रपणे असे सांगायचे आहे की, त्यांनी मनाशी विचार करून पाहिल्यास त्यांना कळेल की अशा तऱ्हेचा आत्मगौरव हा अहंकार नसतो, तर त्याच्या अगदी विरुद्ध असतो. जे उपयुक्तता-वादी टीकाकार आहेत, त्यांच्यापाशी एक मोजमाप-पट्टी असते. ते साहित्याचे ठरीव मोजमाप आणि ठरीव आडाखे बांधून टाकतात. जी कृति त्यांच्यापुढे ठेवली जाईल तिला ते बेलाशक सोयिस्कर श्रेणी देऊन आणि शिक्का मारून मोकळे होतात.

परंतु असमर्थता आणि अनभिज्ञता यांच्यामुळे ज्यांना असे मूल्यमापन अवगत नसते, त्यांना समा-लोचनाच्या प्रसंगी केवळ स्वतःच्या आवडी-नावडी-वरच भरवसा ठेवणे प्राप्त होते. त्यामुळे अशा लोकांपुढे साहित्यविषयक वेदवाक्य म्हणून ठरवून त्याचा पुरस्कार करणे, ही अहमहमिकेची गोष्ट ठरते. कुठले लेखन चांगले किंवा वाईट आहे, या संबंधीचा मतप्रचार न करता, आपल्याला कुठले आवडले किंवा नावडले, हेच सांगणे अधिक उचित.

## साहित्य म्हणजे मानवी जीवनावरील समीक्षण

आता यावर कुणी विचारेल की हे तुमचे म्हणणे, कुणाला ऐकायला हवे आहे, तर त्याला माझे उत्तर असे की साहित्यात नेमकी हीच गोष्ट सारे-जण ऐकत आले आहेत. साहित्याची समीक्षा हीच काय ती समीक्षा असे मानले जाते. परंतु बहुतांशी साहित्य हीच मुळी निसर्ग व मानवीजीवन यावरील समीक्षा आहे. निसर्गासंबंधी, मानवासंबंधी किंवा एखाद्या घटनेसंबंधी कवी जेव्हा स्वतःचा आनंद, विषाद किंवा विस्मय प्रगट करताना, स्वतःचे मनोभाव केवळ आवेगाच्या रूपाने आणि रचनाकौशल्याच्या द्वारे, इतरांच्या मनात उतरवण्यास उद्युक्त होतो, त्यावेळी त्याला कुणी दोष देत नाही. त्यावेळी वाचकही त्याला आत्मीयतेची जोड देताना एवढेच पाहात असतो की, ‘ कवीचे म्हणणे आपल्या मनाशी जुळते की नाही ? ’ काव्याचे समालोचक सुद्धा युक्ति, तर्क इत्यादींच्या आधाराने उच्च-नीच श्रेणी ठरविण्याचे धोरण टाकून देऊन, काव्यातला भाव जर वाचकांपर्यंत पोचविण्याचा प्रयत्न करील तर त्याला बोल लावणे योग्य ठरणार नाही.

## बाळगाण्याची मोहिनी

विशेषकरून आज मी ज्या गोष्टीचा स्वीकार केला आहे, तिच्यात आत्मकथेचा थोडासा अंश येतोच येतो. बाळगाण्याचा जो रसास्वाद मी घेतो, त्याला बाळपणाच्या स्मृतीपासून अलग करणे मला अशक्य वाटते. त्या गाण्यांचे माधुर्य स्वतःच्या बाल्य-स्मृतीशी किती आणि साहित्याच्या चिरस्थायी मूल्यांशी आणि आदर्शांशी किती निगडित झाले आहे, याचे विश्लेषण करण्याचे सामर्थ्य प्रस्तुत लेखकात नाही, ही गोष्ट प्रारंभीच कबूल केलेली बरी.

‘ वृष्टि पडे टापूर टोपूर नदी एक बान ’ (पाऊस टपटप पडतोय, नदीला पूर आलाय.), हे गाणे बाळ-पणी एखाद्या मोहमंत्रासारखे मला वाटे. त्याची मोहिनी मी अजूनही विसरू शकत नाही. मनाच्या त्या मुग्ध अवस्थेचे स्मरण ध्यानी घेतले नाही, तर त्या गाण्यांचे माधुर्यही मला कळणार नाही, की








उपयुक्तताही समजणार नाही. इतकी महाकाव्ये, खंडकाव्ये, तत्त्वकथा, नीतिप्रचार, मानवाने प्राणपणाने चालविलेली यातायात, एवढी घाम गाळून केलेली मेहेनत सारी व्यर्थ होते, विसरली जाते; आणि ही सारी विसंगत, अर्थशून्य यदृच्छेनेच निर्माण झालेली गाणी लोकांच्या स्मृतीत चिरकाल कशी प्रवाहित होत राहिली आहेत, याचे मला गूढ पडले आहे !

## गाण्यातील चिरत्व

या साऱ्या गाण्यात एक प्रकारचे चिरत्व आहे. कोणते गाणे कोणत्या वेळी कोणी केले, याचा काहीसुद्धा थांगपत्ता नाही; त्याचप्रमाणे कोणत्या शतकात, कोणत्या दिवशी, कोणी ती रचली, असा प्रश्न कुणाच्याही मनात उभा राहात नाही. या त्यांच्या स्वाभाविक चिरत्वाच्या गुणामुळेच, ती आज रचलेली असली — पुरातन व हजार वर्षांपूर्वी रचलेली असली — तरी नूतनच वाटतात.

नीट पाहिले तर बालकाच्या मनासारखे आणखी काहीही नाही. देश, काल, शिक्षण व प्रथा यांच्या-परत्वे प्रौढ माणसाचे किती नवीन परिवर्तन झाले आहे. परंतु बालक मात्र शेकडो वर्षांपूर्वी जसे होते तसेच आजही आहे. हेच अपरिवर्तनीय पुरातनत्व मानवाच्या घरी बालमूर्तींच्या रूपाने जन्म घेत असते म्हणूनच अगदी प्रारंभाच्या दिवशी ते जितके नवे, जितके सुकुमार होते, तितकेच आजही आहे. या नूतन चिरत्वाचे कारण असे की, ते बालकाच्या प्रकृतीची निर्मिति आहे; परंतु प्रौढ मनुष्यही बहुतांशी मानवाने स्वतःच बनवलेली कृति आहे. लोकगीतेही त्याप्रमाणेच शिशुगीते आहेत. ती मानवाच्या मनात आपल्या आपणच जन्मतात.

## मनावर पडणारे विश्वाचे प्रतिबिंब

आपल्या आपणच ती उत्पन्न होतात हे सांगण्यात एक विशेष तात्पर्य आहे. स्वभावतःच आपल्या मनात सभोवारच्या विश्वाचे प्रतिबिंब आणि प्रतिध्वनी छिन्नभिन्न स्वरूपात फिरत असतात. ते विचित्र रूप धारण करतात आणि एकाएकी एका प्रसंगातून दुसऱ्या प्रसंगात शिरतात. ज्याप्रमाणे हवेत रस्त्यावरची धूळ, फुलांचे पराग, असंख्य वास, विचित्र शब्द, तुटकी पाने, पाण्याचे तुषार, पृथ्वीची वाफ— गिरक्या घेणाऱ्या लोळत जाणाऱ्या जगाचे विचित्र असे वर फेकलेले, उडणारे असे हे सूक्ष्म अंश, नेहमी उगीचच भटकत भरकटत राहातात, — त्याचप्रमाणे आपल्या मनात अगदी तसेच होत असते. तिथेही आपल्या नित्य प्रवाहित होत असलेल्या चेतनेच्यामध्ये किती रंग, किती गंध, किती नाद, आणि किती शब्द, कल्पनांची केवढी वाफ, विचारांचा केवढा आभास, भाषेची किती शकले, आपल्या व्यवहाराच्या जगातले शेकड्यांनी भरतील असे कितीतरी टाकलेले, विसरलेले पदार्थ, अगदी दुर्लक्षित स्थितीत वाहात वाहात फिरतच असतात.

ज्या वेळी आपण जाणीवपूर्वक एखाद्या विषयाकडे विशिष्ट दृष्टीने लक्ष देऊन विचार करू लागतो, तेव्हा हे सारे गुंजन बंद पडते; हे सारे रेणुजाल दूर उडून जाते; हे सारे मृगजळ क्षणाभरातच नाहीसे होते. आपल्या कल्पना, आपली बुद्धि, या एकाच विषयावर एकवटल्यामुळे एकत्रच वाहू लागतात. आपली मन नावाची वस्तु इतकी विलक्षण प्रभावशाली आहे, इतकी की मन एकदा जागृत होऊन चलनवलन करू लागले की त्याच्या प्रभावाने आपल्या अन्तर्विश्वातल्या प्रमाणेच बहिर्विश्वातला बहुतेक भाग प्रस्फुरित होतो. त्याच्या अनुशासनाने, त्याच्या नियमाने, त्याच्याच म्हणण्याप्रमाणे, त्याचेच दासानुदास बनून, सारे जग चालत असते. तसे पाहिले तर आकाशात पक्ष्याची तान, पानांची खिसखिस, पाण्याची कलकल, माणसांच्या घरांतले विविध संमिश्र आवाज, लहान मोठे हजारो कलरव नेहमीच उठत असतात. त्याचप्रमाणे आपल्या चोहोबाजूंनी किती कंपने किती आंदोलने, किती जाणी, किती येणी छायाप्रकाशाचे कितीक चंचल खेळते प्रवाह, नियमाने फिरतच असतात —आणि त्यातला कोणता तरी एक क्षुल्लकसा अंश आपल्याला प्रतीत होत असतो; याचे मुख्य कारण हेच की कोळ्याप्रमाणे आपले मन ऐक्याचे जाळे टाकून एकाच फेकीत, एकाच क्षणी, जितके धरता येईल, तितकेच ग्रहण करते; बाकीचे सारे त्यातून निसटून जाते. जिथे ते पाहू शकते, तिथे ते बहुधा ऐकत नाही. जिथे ऐकू शकते, तिथे पाहात नाही; आणि म्हणूनच जेव्हा ते विचार करू लागते, तेव्हा ते बहुतेक पाहातही नाही








की ऐकत नाही. आपल्या उद्दिष्टाच्या मार्गावरून अनावश्यक वस्तूंना ते बऱ्याच प्रमाणात दूर ठेवू शकते. या त्याच्या सामर्थ्यामुळेच या जगाच्या असीम वैचित्र्यातही ते स्वतःच्या जवळच्या परिसरात स्वतःचे रक्षण करू शकते. पुराणात आपण वाचतो की पूर्वीच्या काळी कुणा कुणा महात्म्यांनी इच्छामरणाची शक्ति प्राप्त करून घेतली होती. आपल्या मनाला इच्छान्धतेची आणि इच्छाबधिरतेचीही शक्ति मिळालेली आहे. म्हणूनच जगाचा अधिकांश तिच्या चेतनेच्या बाहेरच्या अंगावरून निसटूनच जातो. मन प्रयासपूर्वक जे जे ग्रहण करते अन् स्वतःच्या प्रवृत्तीप्रमाणे गोळा करते तेवढेच त्याला लाभते. चारी बाजूंना तर काय, पण स्वतःच्या मनोभूमीत जे घडत असते, जे उफाळत असते त्याची नीट दखलही ते ठेवीत नाही.

सहज अवस्थेत आपल्या मानसाकाशात, स्वप्नाप्रमाणे ज्या साऱ्या छाया आणि शब्द, कोणत्या तरी अदृश्य वायूच्या प्रभावाने, दैववशात चाळवळयामुळे, कधी एकत्र तर कधी वेगवेगळे होऊन विचित्र आकारात, रंग बदलीत, एकामागून एक येऊन, ढगासारखे जमून फिरतात, त्यांना जर एखाद्या अचेतन पटावर स्वतःच्या प्रतिबिंबाचे प्रवाह नोंदून ठेवता आले असते, तर त्यांच्याशी, आता ज्यांची चर्चा मी करतो आहे, त्या गाण्यांचे बरेच सादृश्य आहे, असे दिसून आले असते. ही गाणी आपल्या नियमित व परावर्तित अंतराकाशातली छायाच आहेत. स्वच्छ व तरल सरोवराच्या पृष्ठभागावरच, ढगांचा खेळ चाललेल्या नभोमंडळाची छाया असावी त्याप्रमाणे ती आपल्या आपण जन्मली असे मी जे म्हटले ते एवढ्यासाठीच !

## गाण्यातील अमृतमधुर सूर

उदाहरणादाखल, इथे एक दोन गाणी द्यायच्या आधी मी वाचकांची क्षमा मागतो. पहिल्याने ज्यांना स्नेहार्द्र सुस्वर स्त्रीकंठाचे चिरसान्निध्य या गाण्यांना लाभले, ते नाद माझ्यासारख्या वयस्क, गंभीर व स्वतःच्या मर्यादांविषयी साशंक असणाऱ्या पुरुषाच्या लेखणीतून कसे उमटतील ? वाचकहो, आपण घरातून बाल्यस्मृतीतून तो अमृतमधुर सूर आपल्या मनातच साठवून ठेवा. त्याच्याबरोबर जो स्नेह, जे संगीत, ज सांजवातीने उजळलेले सौंदर्यचित्र चिरकाल एकात्मभावाने मिश्रित झालेले आहे, ते मी कोणत्या मंत्राने वाचकांच्या समोर उभे करू शकेन ? माझी खात्री आहे की या बाळगाण्यातच तो मोहमंत्र अंतर्भूत झालेला आहे.

दुसरी गोष्ट अशी की शिष्ट भाषेत लिहिलेल्या या निबंधामध्ये सर्व घरगुती, अनलंकृत, असंस्कृत स्त्रीगीतांना ओढून आणणे हे जबरदस्तीने कुलवधूला न्यायालयाच्या साक्षीच्या पिंजऱ्यांत खेचण्यासारखे आहे. परंतु त्याला उपाय नाही. न्यायालयाच्या नियमानुसार न्यायाचे काम चालते. निबंधलेखनाच्या नियमानुसार निबंधाची रचना करायला हवी-यात थोडेसे नैष्ठुर्य अपरिहार्यच आहे.

जमुनावती सरस्वती काल जमुनार बिये जमुना जावेन श्वशुरवाड़ि काजितला दिये काजिफूल कुड़ते पेये गेलूम माला हात–झुमुझुम्–पा झुमुझुम् सीतारामेर खेला नाचो तो सीताराम कांकाल बेंकिये आलोचाल देव टोपाल भरिये आलोचाल खेते थेते गला हल काठ हेथाय तो जल नेई त्रिपुर्णिर घाट त्रिपुर्णिर घाटे दूटो माछ भेसेछे एकटि निलेन गुरुठाकुर एकटि निलेन के तार बोनके बिये करि ओड़फूल दिये ओड़फूल कुड़ते हये गेल बेला तार बोनके बिये करि ठिक दुष्कर बेला. [ यमुनावती आणि सरस्वती, उद्या यमुनाचे लग्न. यमुनावती सासरी जाणार. काजीतला ( गावी ) तिला दिले आहे. काजिफूल वेचताना मला माळ मिळाली. हातात ( कांकणांची ) रुमझुम, पायी ( वाळ्यांची ) झुमझुम, आणि सीतारामाचा खेळ, सीताराम, कंबर वाकवून नाच तर खरा. सुकवलेल्या ( आलोचाल ) भाताने टोपली भरून देईन. वाळवलेला भात खाता खाता घसा कोरडा पडला. इथे तर पाणी नाही. त्रिपुर्णीचा घाट. इथे तर त्रिपुर्णीच्या घाटावर दोन मासे वाहून आले आहेत. एक मासा गुरुदेव घेऊन गेले; दुसरा मासा कुणीतरी नेला. त्याच्या बहिणीशी ओडफूल देऊन मी लग्न लावतो. ओडफुले वेचण्यात वेळ टळून गेली, आणि त्याच्या बहिणीशी बरोबर दोन प्रहरी मी लग्न करतो आहे. ]

याच्यात अर्थाचा परस्परसंबंध नाही ही गोष्ट कमालीच्या पक्षपाती समीक्षकालाही मान्य करणे








प्रातच आहे. कित्येक असंलग्न प्रतिमा अत्यंत सामान्य प्रसंगाचे सूत्र धरून दाखल केलेल्या आहेत. त्यात कोणत्याही प्रकारची निवड केलेली नाही, हे उघडच आहे. जणु कवित्वाच्या सिंहद्वारी शरद्‌ऋतूतल्या शांत दुपारच्या गोड उन्हात पहारेकरी बेटा पाय पसरून झोप घेत पडलेला आहे. कथा आणि भाव कोणत्याही प्रकारे, आपली ओळखही न पटवता, कोणतीही सबब शोधून न काढता, अगदी विनायास त्याचे पाय ओलांडून, एवढेच काय पण अधून मधून हलक्या हातांनी त्याला कानपिचक्या देऊन, कल्पनेच्या अभ्र-भेदी मायाप्रासादात मनाला येईल त्याप्रमाणे येत आणि जात असतात. द्वारपाल डुलक्या घेता घेता जर मध्येच चमकून उठला, तर ही मंडळी त्याच क्षणी कुठे पळून जाऊन पार झाली असती त्याचा पत्ताही लागला नसता.

यमुनावती, सरस्वती, कुणीही असोत. उद्या त्यांचा शुभविवाह आहे, या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख आढळून येतो. मग ओघानेच विवाहानंतर योग्य वेळी काजितला गावी दिल्यामुळे त्यांना सासरी जावे लागणार, या गोष्टीचा मुळी उल्लेख केला नसता, तरी चालले असते. काही झाले तरी कथा अतिशय अप्रासंगिक होता कामा नये. परंतु विवाहाबद्दल कोणत्याही प्रकारची खटपट किंवा त्याविषयी कुणालाही तिळभर औत्सुक्य वाटते आहे, असे जराही आढळून येत नाही. इथे सर्व व्यवहार अनायासे घडू शकतात किंवा घडूही शकत नाहीत. तसेच कुणालाही कुणाबद्दलही जरा सुद्धा चिंताग्रस्त व्हावे लागत नाही की, त्रास काढावा लागत नाही. म्हणूनच उद्या श्रीमती यमुनावतीच्या विवाहाचा दिवस ठरलेला असूनही त्या घटनेला लव-मात्र प्राधान्य दिले जात नाही. आणि म्हणूनच ही गोष्ट प्रारंभी का सांगितली गेली याचे उत्तर देण्याचीही कदर कुणाला नाही. काजिफूल हे कसले फूल आहे हे मी शहरवासी असल्याने मला नीट सांगता यायचे नाही. परंतु एवढे अनुमान मात्र मला स्पष्टपणे करता येते की, यमुनावती नावाच्या मुलीच्या, जवळ येऊन ठेपलेल्या विवाहाशी, उपरोक्त फुलांच्या संचयाचा काहीही संबंध नाही. कारण तेवढ्यात एकदम मध्येच सीताराम म्हणून कुणी, हातातली कडी आणि पायातले चाळ छुमछुम वाजवीत का नाचू लागला, त्याचे तिळमात्रही कारण मी दाखवू शकणार नाही. वाळव-लेल्या भाताचे प्रलोभन हे एक मस्त कारण होऊ शकेल; परंतु तेच कारण आपल्याला सीतारामाच्या आकस्मिक नृत्यापासून एकदम त्रिपूर्णीच्या घाटावर नेऊन उभे करते. त्या घाटावर दोन मासे वाहात आले तर त्यात काहीच आश्चर्य नाही. परंतु नवलाची गोष्ट अशी की, त्या दोन माशांपैकी एक मासा जो कुणी माणूस घेऊन गेला, त्याचा कुठलाच हेतु माहीत नसतानाही आमचा दृढप्रतिज्ञ कवि कशासाठी कोण जाणे त्याच्याच बहिणीशी लग्न करायचा दृढ संकल्प करून बसला आहे ! एवढेच नव्हे तर चालू विवाहपद्धतीची संपूर्ण उपेक्षा करून, केवळ एकाच ओडफुलाच्या संग्रहाच्या बळावर ते शुभकार्य व्यवस्थित उरकू बघतो आहे. तेही नव्या किंवा जुन्या पंचाग-काराच्या मताने योग्य असे नाही.

कवितेची घडण ही अशी आहे. माझ्यावर जर ती रचायची जबाबदारी पडती, तर मी अशा काही कौशल्याने संविधानक रचले असते, की त्यामुळे प्रथम उल्लेखिलेली यमुना व तीच ग्रंथाच्या शेवटच्या परि-च्छेदात त्याच त्रिपूर्णीच्या घाटावर, त्या अनिर्दिष्ट माण-साची बहीण म्हणून उभी राहिली असती; आणि भर दुपारी ओड फुलांच्या माळांची अदलाबदल झाल्याने जो गांधर्वविवाह घडून आला असता, त्याने सहृदय वाचकांचीही तृप्ति झाली असती.

परंतु बालकांच्या सृष्टीत मनाचा प्रभाव फार क्षीण असतो. बाहेरचे जग, जगाचा प्रपंच-व्यवहार आणि त्यांच्या स्वतःच्या कल्पना त्यांच्या मनावर विध्वंसक आघात करतात. एकापाठीमागून एक अशा उपस्थित होतात. मनाचे बंधन बालकाच्या दृष्टीने तापदायक असते. कार्यकारणभावात सुसंगति ठेवून कोणतीही गोष्ट पहिल्यापासून अखेरपर्यंत नेटाने धरून राहाणे मुलांना जमत नाही. बाह्य जगात, समुद्राच्या किनाऱ्यावर बसून मूल वाळूचे घर बांधू शकते. वाळूला वाळू जोडली जात नाही. ती कधी स्थिर असत नाही. परंतु वाळूत कोणत्याही प्रकारची योजना करणे शक्य नसणे, हेच मुळी बाळपणाच्या बांधकामाचे मुख्य साधन. घटका-भरातच मूठ मूठ करून वाळूला एका उंचवट्याचा आकार देता येतो. मनाजोगते न जमल्यास त्याचे








संशोधन करणे सोपे असते; आणि त्याने जर का समाधान न झाले तर, त्याच क्षणी त्याला लाथेने उडवून देऊन भुईसपाट करून त्याचा तो लीलामय – खेळांत गुंतलेला निर्माता निःशंकमनाने आनंदात घरी निघून जातो. परंतु जिथे जुळवून कार्य करायचे असते तिथे कर्त्यालाही तावडतोब कामाच्या नियमाप्रमाणे चालावे लागते. बालकनियमांकडे पाहून चालू शकत नाही– ते आताच्या या वेळीच काय तें, नियमहीन, इच्छेच्या आनंदमय स्वर्गात असते. आपल्याप्रमाणे दीर्घकाळ त्याला नियमांच्या गुलामगिरीची संवय झालेली नसते; म्हणून ते आपल्या अल्प शक्तीप्रमाणे समुद्रकिनाऱ्यावर वाळूचे घर आणि मनात गाण्याची प्रतिमा स्वतःच्या इच्छेप्रमाणे रचते आणि पृथ्वीवरच ईश्वराच्या जग निर्माण करणाऱ्या क्रीडेचा अनुभव घेते. म्हणूनच आमच्या शास्त्रात ईश्वराच्या कृतीची बालकाच्या लीलेशी नेहमी तुलना करण्यात येत असते. दोहोंमध्येही एक प्रकारच्या इच्छामय आनंदाचे सादृश्य आहे.

वर दिलेल्या गाण्यात सुसंलग्नपणा नाही परंतु प्रतिभा आहेत. काजितला, त्रिपूर्णीचा घाट आणि ओडवन, या घटना स्वप्नाप्रमाणे अद्‌भुत परंतु स्वप्नाप्रमाणे सत्यही आहेत.

स्वप्नाप्रमाणे सत्य म्हटले म्हणून वाचकांनी माझ्या बुद्धीच्या निकोपपणाबद्दल शंका घेण्याचे कारण नाही. अनेक तत्त्ववेत्त्या पंडितांना स्वप्नाला उडवून लावणे जमले नाही. ते म्हणतात, प्रत्यक्ष आहे ते सत्य नाही, तर मग ते काय आहे ? नाही ते स्वप्न आहे. याप्रमाणे पाहू गेल्यास सबळ तर्काच्या आधारे सत्याला नाकारणे सोपे आहे; परंतु स्वप्न नाकारणे मात्र कठीण आहे. केवळ जागेपणचे स्वप्नच नव्हे तर झोपेतल्या स्वप्नाच्या बाबतीतही हेच आढळते. झोपेत असताना स्वप्नाबद्दल शंका बाळगणे तीव्र बुद्धीच्या पंडितांनाही जमलेले नाही. जागृत अवस्थेत ते सत्याबद्दलही शंका घ्यायला कमी करीत नाहीत; परंतु स्वप्नस्थितीत मात्र ते परमावधीच्या असंभाव्य गोष्टींचाही निःसंदिग्धपणे स्वीकार करतात; म्हणूनच विश्वासजनकता हा सत्याचा जो सर्वांत श्रेष्ठ गुणधर्म मानणे उचित, तो जसा स्वप्नात असतो तसा अन्य कुठेही नसतो.

यामुळे वाचकांनी हे लक्षात ठेवावे की जसे प्रत्यक्ष जग आपल्या बाबतीत सत्य असते, त्याच्याहूनही गाण्यातले स्वप्नमय जग नेहमी स्वप्ने पाहाणाऱ्या बालमनाला अधिक खरे वाटते. म्हणूनच अनेक वेळा सत्याचाही आपण असंभवनीय म्हणून त्याग करतो; परंतु मुले जे असंभवनीय त्याचाच सत्य म्हणून स्वीकार करतात.

---

### बौद्धधर्माकडे का ?

" महाराष्ट्रातील एका बहुसंख्यांक वर्गाने बौद्धधर्माचा स्वीकार केला या घटनेचा सहानुभूतीपूर्वक विचार होणे अवश्य आहे. बुद्ध हा भारतीयच व भारतीय संस्कृतीचा होता व त्याचे आयुष्यकार्य भारतीय समाजाच्या कल्याणाकरिताच होते म्हणून बौद्धधर्माविषयी आपणास परकेपणा अथवा असूया वाटण्याचे यत्किंचितही कारण नाही. आपणापुढे तातडीचा प्रश्न आहे तो इतकाच की या वर्गास धर्मान्तर वा पन्थांतर करणे का भाग पडले ? याचे उत्तर एवढेच की जुन्या हिंदुधर्मात सुधारणा घडवून येण्याविषयी पूर्ण निराशा झाली तेव्हाच तर्कशुद्ध अशी एकच सोडवणूक म्हणून बौद्धधर्म स्वीकारणे त्यांनी पत्करले. हिंदुसमाजाचा व धर्माचा गेल्या हजार दोन हजार वर्षांचा इतिहास अभ्यासिला तर या निराशेस सबल कारणे आहेत अशी प्रांजाळपणे कबूली देणे प्रत्येक प्रामाणिक माणसास भाग आहे. "

— डॉ. सुमंत मुरंजन
( म. सा. परिषदेच्या अध्यक्षपदावरून )








## वाचकांचा–पत्रव्यवहार

### " छंद:शास्त्राची चाळीस वर्षे "

' नवभारता'च्या सप्टेंबर १९६२ च्या अंकात प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांचा " छंद:शास्त्राची चाळीस वर्षे " नावाचा लेख आला आहे. अत्यंत उत्तम प्रकारचा आढावा त्यात आहे; प्रसंगपरत्वे " मराठी छंदोरचना " या माझ्या पुस्तकाचा व त्यातील मतांचाही सडेतोड विचार त्यात केलेला आहे. लेखातील जवळजवळ सर्व मतांशी मी सहमत आहे. खाली ज्या मुद्याबद्दल लिहित आहे तोही तसाच संमत झाला असता तर फारच उत्तम गोष्ट झाली असती; कारण कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या " छंदोरचना " ग्रंथाकडे मी, या लेखाच्या लेखकाप्रमाणेच ' त्यातील अभिप्राय समजून घेण्याच्या ' दृष्टीनेच सतत पाहिले आहे व पहात आहे. शंकास्थळे अशी–

( १ ) ' मराठी छंदोरचने'त अनावर्तनी वृत्तांना " आवर्तनी ठरविण्याचा व्यर्थ खटाटोप " आहे;

( २ ) " पटवर्धनांनी ' अनावर्तनी ' म्हणजे ' लयहीन ' असे कोठेही प्रतिपादिलेले नाही. "

" मराठी छंदोरचनेत"त सर्वच वृत्तांना आवर्तनी दाखविण्याचा खटाटोप केल्यासारखे मला काही आढळत नाही. चरणात शक्य तेथे, चालीला जुळत असेल तर, आवर्तने दाखविली आहेत. अन्यथा विषममात्रक गटही दर्शविलेले आहेत.

" छंदोरचने"तील लयीची कल्पना व्यापक आहे, असे मलाही वाटते. पण लयतत्त्वाचे स्पष्टीकरण करताना त्यात ' टाळी'चा उल्लेख अनेकदा आलेला आहे व टाळी वाजविण्याच्या क्रियेची तबला वाजवणाऱ्याच्या स्थितीशी तुलना केलेली आहे (" छंदोरचना, " पृ. १६–१७). ' छंदोरचना'कार म्हणतात,

" ... आपण मधून मधून टाळी वाजवित रहातो, कविता संपली तरी एकदोनदा टाळी पुढे वाजवितोच. (ऐकणारा) आपल्या तंद्रीत, लागलेल्या लयात टाळी देतच राहतो.

" एक तुकडा तीन पळात उच्चारिला गेला तर प्रत्येक तीनतीन पळात उच्चारिला जातो. " (हे तुकडे ' समदीर्घ ' असतात.) तुकडा–अक्षरे मिळून होतो ... सारे तुकडे चार चार अक्षरांचे आहेत." (' कशासाठी । पोटासाठी ' वगैरे गीताच्या उदाहरणात हे आलेले आहे.)

यात आवर्तनावरच भर आहे असे मला अजूनही, पुन्हा वाचल्यावरही, वाटते. अनावर्तनी वृत्तातील आंदोलने दाखवूनही जरी आवर्तने दाखविता आली नाहीत, तरी ते छंद असल्यामुळे निर्वाह करावा लागला. निदान वृत्तातील आंदोलनात लय मानल्यावर स्वैर पद्यातील व मुक्तशैलीतील आरोहावरोहांना " छंदोरचनाकारांनी मान्यता का देऊ नये ? आवर्तनात्मक लयीचा पगडा हेच त्याचे उत्तर.

— ना. ग. जोशी

---

### " मधुराभक्ति "

'नवभारत'च्या ऑगस्टच्या अंकात 'मधुराभक्ति : उद्गम व विकास ' हा लेख आला आहे. लेखकाकडून खालील शंकांना उत्तरे मिळाली काय ?

( १ ) भागवत या सर्वमान्य ग्रंथात राधेचा उल्लेखही नाही मग राधा–कृष्ण उपासनापद्धती भागवतातून विकास पावली हे कसे काय ?

( २ ) शृंगारभक्तीची व्यवच्छेदक लक्षणे ?

( ३ ) प्रश्न दोन याचें उत्तर जर उपमा, दृष्टान्त, या व्यतिरिक्त अन्य नसेल तर ज्ञानेश्वर, तुकाराम, कबीर, मीरा, यांनी व्यक्तिगत विरहिणी, विराण्या, अभंग व पदे लिहिली ती का ? ' मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें । अलौकिक नोहावें । लोकाप्रति । ही ओवी लिहिणारेच विरहिण्या लिहितात ते मधुराभक्ति ' क्वाऽपि पात्रे ' समजूनच लिहितात ना ? हिऱ्यामाणकाच्या खाणीत








अनर्घ्य रत्नाप्रमाणे( Rarefind ) कोट्यवधीत हा भक्त आगळाच ! !

( ४ ) " योग हे तंत्राचे दुसरे महत्त्वाचे अंग...तंत्रसाधनेत अभिचार आणि वामाचार यांना महत्त्व. " ही वाक्ये अतिव्याप्त नाहीत का ?

( ५ ) " यातही ( योगात ) पुरुषाच्या देहातील ' स्त्रीतत्व ' जागृतीलाच महत्त्व आहे " षट्-चक्र भेदनाने स्त्रीत्व पावणे, याला मान्य महाराष्ट्रीय ग्रंथांत आधार ?

आमचे समजुतीने ज्ञानेश्वरीत ज्याचा पंथराज म्हणून उल्लेख आहे तो **कुंडलिनी योग तांत्रिकच.** नाथ संकेतीचा दंश झालेले महान् योगेश्वर तात यांनी ज्ञानेश्वरी ६ वे अध्यायात याचे विस्तृत वर्णन केलेले आहे. नारदभक्ति सूत्रात ' सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ' हे आरंभीच सांगून झाल्यावर– निर्मानमोही संगदोषजित समजले जाणारास 'विरहिण्या पसंत नाहीत' असे जेव्हा आम्हास सांगितले जाते तेव्हा साधनभिन्नतेत सदर भक्तिसाधनेत– या दालनात पदक्षेप करावयाची पात्रता त्यांना नाही एवढेच आम्ही समजतो. हा विषय त्यांना अनाकलनीय एवढेच.

परमेश्वराचे ( भगवान श्रीकृष्णाचे ) जन्म-कर्म दिव्य होय. कान्तासक्ति, परमविरहासक्ति, यावर अधिक्षेप करणारांचे म्हणणे म्हणजे– बरळणे ' जनजल्प ' याची ग्वाही एकमते भक्त्याचार्यांनी त्याच नारदभक्तिसूत्रात दिली आहे.

— **विनायकराव करमळकर.**

---

## पंचवार्षिक योजनांतील मूलतत्त्वे

आर्थिक क्षेत्रात ज्या प्रचंड उलाढाली घडून येत आहेत व घडणार आहेत त्यात उत्स्फूर्त असलेली मूलतत्त्वे सामाजिक सुधारणास अनुकूलच आहेत. संसार-त्याग व दारिद्रय यात महनीयता नसून दारिद्र्यामुळे १००० पैकी ९९९ माणसे जीवनाच्या परमोच्च आनंदास व कर्तृत्वास मुकतात व त्यांचे जीवन करपून जाते हे आपल्या पंचवार्षिक योजनांचे प्रथम तत्त्व आहे. वैयक्तिक वा राष्ट्रीय दारिद्रय हा पूर्वसंचित कर्माचा परिपाक वा नशिबाचा खेळ नसून तो समाज-संघटनेचा दोष आहे व सांघिक प्रयत्नांनी या दारिद्र्याचा निरास करणें मानवसुलभ आहे, हे या योजनांचे दुसरे तत्त्व आहे. तिसरे तत्त्व असे आहे की, समाजात उत्पन्न होणारी संपत्ति जितक्या समप्रमाणात समाजातील व्यक्ति व घटकांत विभागली जाईल तितक्या प्रमाणात विभागली जावी. समाजहितप्रमुख अर्थव्यवस्थेचे हे स्वरूप यथार्थ समजावून घेतले म्हणजे निरनिराळ्या स्वरूपात व निरनिराळ्या निमित्तानी भारतांत जे आचारविचार व ज्या समजुती आजतागायत बद्धमूल झाल्या आहेत त्या नव्या युगाच्या आर्थिक आकांक्षा व नैतिकमूल्ये यांच्याशीं कशा विसंगत आहेत ते स्पष्ट होते. पंचवार्षिक योजना म्हणजे फक्त डाळरोटीची व्यवस्था नाही. पंचवार्षिक योजनांनी आमच्या मध्ययुगीन जीवव्यवस्थेस क्रांतीचे आव्हान दिले आहे.

— **डॉ. सुमंत मुरंजन**

( महाराष्ट्र सामाजिक परिषदेच्या अध्यक्षपदावरून )









अनुक्रमणिका

## पुस्तक-परामर्श —

### ' चला चंद्राकडे '

### शास्त्रीय विषयावरील ललित पुस्तक

मराठी मासिकातून शास्त्रीय विषयावर लिखाण करणारे जे थोडे लेखक आहेत त्यांत डॉ. चिं. श्री. कर्वे यांची गणना प्रमुखत्वाने करावयास पाहिजे. डॉ. कर्वे हे कित्येक वर्षे पुण्या-मुंबईच्या महाविद्यालयात पदार्थविज्ञानाचे प्राध्यापक म्हणून काम करीत आहेत; त्यामुळे या विषयाचा त्यांचा व्यासंग मोठा आहे हे सांगावयास नकोच. ' चला चंद्राकडे ' या विषयावर त्यांनी ठिकठिकाणी जी व्याख्याने दिली तीच लेखरूपाने या पुस्तकात एकत्र केली आहेत.

शास्त्रीय विषयावर लेखन करताना प्रमुखत्वाने दोन अडचणी येतात. एक अडचण परिभाषेची व दुसरी अडचण विषय शास्त्रीय असल्यामुळे लेख रूक्ष होण्याची. डॉ. चिं. श्री. कर्वे यांनी या दोन अडचणींचा या पुस्तकात कोठेही मागमूस लागू दिलेला नाही. या पुस्तकातील कोणतेही प्रकरण उघडले तरी तो ललित लेखच आहे असे वाटते.

या पुस्तकात एकूण अकरा प्रकरणे असून चंद्र व पृथ्वी यांचे संबंध कोणते, चंद्रसृष्टि कशी आहे, चंद्रावर जाण्यात अडचणी कोणत्या, याबाबतीत रशियाने व अमेरिकेने कोणकोणते प्रयत्न केले व त्यात प्रगतीचा कोणता टप्पा गाठला इ० विषयांचा ऊहापोह केला आहे. काही काही शीर्षके मोठी आकर्षक वाटली— ' अंतराळातील कोलंबसाचे अंतरिक्षातील उड्डाण ' ' अंतराळातील एक दिवस आणि एक तास', 'शुक्राकडे पाठविलेला पाहुणा ' इ० विषय समजण्याच्या दृष्टीने शास्त्रीय पुस्तकात पुष्कळ चित्रे असणे आवश्यक आहे. या पुस्तकात त्याप्रमाणे चित्रे भरपूर दिली आहेत. ' चंद्रावरून पृथ्वी कशी दिसेल', ' चंद्रावरील बस कशी असेल', 'शुक्राकडे पाठविलेला अग्निबाण,' ' अंतराळोड्डाणात माकड शिकविल्याप्रमाणे आपली कामगिरी कशी करीत आहे ' इ. चित्रे पाहून वाचकाचे या विषयासंबंधीचे कुतूहल वाढल्याशिवाय राहात नाही.

पुस्तकातील सर्व प्रकरणात ' अंतराळ तळावर ' व ' चला चंद्राकडे ' ही प्रकरणे विशेष वाचनीय आहेत. लेखकाने आपले कल्पनाचातुर्य व लेखन-चातुर्य या प्रकरणात उत्तम तऱ्हेने प्रगट केले आहे. चंद्रावर जाण्यात मानवाला यश मिळाल्यानंतर १९८६ साली काय काय घडेल याचे रम्य चित्र लेखकाने यात रेखाटले आहे. वाचकाशी गप्पा मारीत मारीत लेखक वाचकाला स्वतःबरोबर चंद्रावर नेत आहे व अनुभव कथन करीत आहे असे वाटल्यावाचून राहात नाही. कल्पनाचित्र रंगविताना शास्त्रीय सत्याकडे वा शास्त्रीय कार्यकारणपरंपरा याकडे दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. पण लेखकाने याबाबतीत संपूर्ण काळजी घेतलेली दिसते.

संपूर्ण पुस्तक वाचल्यानंतर वाचकाच्या मनावर कोणता परिणाम होतो हे पाहणेही मनोरंजक ठरेल. निदान माझ्या मनावर तरी तसा परिणाम झाला. विश्वाचे व्यापकत्व पाहून एकीकडे मन थक्क होते. तर दुसरीकडे त्या विश्वाच्या व्यापकत्वावरही आपल्या बुद्धिबलाने मात करण्याची मानवाची महत्त्वाकांक्षा पाहून व त्यादृष्टीने मानवाने आतापर्यंत मिळविलेले यश पाहून मन थक्क होते.

वाचकाला ज्याविषयी कुतूहल आहे त्या शास्त्रीय विषयावर आकलनीय पुस्तक लिहिल्याबद्दल डॉ. कर्वे यांचे मराठी वाचक अभिनंदनच करतील. हे पुस्तक वाचल्यानंतर सामान्य मराठी वाचकाचा बहुश्रुतपणा खचितच वाढेल.

( ' चला चंद्राकडे '; ले. डॉ. चिं. श्री. कर्वे, प्र. कॉंटिनटल बुक सर्हिस, पुणे २; पृष्ठसंख्या - १०३; मूल्य— रु. २·८० नये पैसे. )

—प्र. नी. नवरे

---





अनुक्रमणिका

## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२.०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ७३.०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०.०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १३८.०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५.०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६२.०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | २५.०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५.०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६.०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०.०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५.०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६.०० |
| (१०) नवमानवतावाद ... ... ... ... | | २.५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३.०० |
| (१२) चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | |
| (१३) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | ३.०० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ... | | २.५० |
| (श्री. चा. अ. दाभोलकर) ... | | २.०० |

॥ श्री ॥

# दी बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लिमिटेड, पुणें-२

जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रकटी ।
तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणो नये ॥

—श्रीज्ञानेश्वरी

———०———

*अंतरीं सद्भावना ठेवून कार्यास प्रारंभ केला कीं, यशःप्राप्ति ठेवलेलीच. कै. आगाशे यांची कळकळीची विनंति व अविरत श्रम व मध्यमवर्गानें त्यांना दिलेलें सहकार्य यामुळें हा कारखाना यशस्वी होऊन मध्यमवर्गीयांचें भूषण झाला आहे. कै. आगाशे यांचेंच धोरण पुढें चालवून संचालक मंडळ कंपनीचें कार्य नेटानें पुढें चालवीत आहे.*

◆◆◆ ◆◆◆ ◆◆◆

**नवीन हंगाम नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत सुरूं होईल**

———

**आमचे भागीदार, ठेवीदार व हितचिंतक यांना ही दिवाळी व नूतन वर्ष सुखाचें व भरभराटीचें जावो.**

—: संचालक मंडळ :—

श्री. शं. ल. लिमये, बी. एस्सी., एल्एल्. बी., वकील
अध्यक्ष

श्री. भ. ग. भाडुले,
बी. एस्सी., एल्एल्. बी., वकील

श्री रामराव माधवराव देशमुख,
बी. ए., एल्एल्. बी. (कॅंट),
बार-ॲट लॉ, एम. पी.

श्री. वि. क. साठे, बी. ए. (टिळक)
माजी पुरवठा मंत्री, मुंबई राज्य

श्री. ग. ह. सवनीस

श्री. श्री. र. केसकर, वकील

श्री. ज. चं. आगाशे

श्री. गो. न. जोशी,
बी. एस्सी.,

मॅनेजर —श्री. के. व्यं. चांफेकर, बी. ई., ए. एम्. आय्. ई.,






